जय श्री हिन्दमाता

संगीत

(प्रसिद्ध मोहीम वसईचे [illegible] संग्रामी)

# मस्तानी

लेखक—

अच्युत बळवंत कोल्हटकर

प्रकाशक—

नरहर रामचंद्र जोशी

प्रथमावृत्ति

किंमत एक रुपया



# मस्तानीची समशेर



प्रस्तुत नाटक महाराष्ट्र वाचकांचे चरणीं अर्पण करतांना त्यांच्या प्रेम दृष्टी शिवाय कशाची अपेक्षा असणार ? इतिहासाचें सुरस फळ नाट्याच्या शर्करेंत घोळतांना नाटयप्रसंगांची छाया ऐतिहासिक वृत्तान्तांवर पडणें अपरिहार्य असतें आणि तशी छाया प्रस्तुत नाटकांतही पडूं दिलेली आहे. विशेषत: नरवीर बाजीरावाची कोंकणची सुप्रसिद्ध मोहीम वसईचे रणसंग्रामाचे अगोदर असतां ती त्या संग्रामाचे बरोबरीनें घेतलेली आहे ! परन्तु इतिहासाचा द्राक्षवेल कारणाशिवाय दुखवला जाऊं नये अशी शक्य तितकी काळजी घेण्यांत आलेली आहे. शिवाय नाटयप्रसंगाच्या बिलोरी आरशांत नुसते नाटयरंगच न दिसतां महाराष्ट्राच्या मर्दुमकीच्या उच्चतम ध्येयाचेंही प्रतिबिम्ब त्यांत पहावयास सांपडावें असाही प्रयत्न करण्यांत आलेला आहे.

ह्या कथानकावर कै. नारायण बापूजी कानिटकर ह्यांनीं एक सुरस नाटक कांहीं वर्षांपूर्वी लिहिलें होतें, आणि रा. रा. दत्तात्रय विष्णु तिनईकर ह्यांनीं त्यास संगीत स्वरूप दिलेलें होतें. प्रस्तुत नाटकाचा मसाला जरी त्या नाटकापासून घेतलेला नसला तरी पूर्वींच्या शाहिरांचे पुण्यकारक आशीर्वाद आधुनिक लेखकांस साह्यभूत होत नाहींत असें कोण ह्मणेल ? ह्याशिवाय ‘ मेजवानी ’ ला जातांना व गहूं हरभऱ्यांच्या पिकांतून सहल करीत असतांना चार दाणे तोण्डांत टाकण्याचा मोह कोणाला होणार नाहीं ? त्यांतही एका प्राचीन शाहीराचा ‘ पंचकल्याणी ’ देखणा घोडा पाहून प्रस्तुत लेखकास बालकाप्रमाणें त्याच्यापुढें बसण्याची अत्यन्त प्रबळ इच्छा झाली. पण प्राचीन मराठी काव्यसाहित्य ही प्रत्येक महाराष्ट्रीयाची वडिलार्जित सम्पत्तीच असल्यामुळें तिचा उपभोग घेत असतां संकोच वाटण्याचे ऐवजीं अभिमान व कृतज्ञताच ज्यास्त वाटली हें सांगावयास यत्किंचितही संकोच वाटत नाहीं !

पद्यांच्या चालींचीं निवड मुख्यतः ' मनोहर ' स्त्री संगीत मण्डळीचे चालकांनीं करविली आणि रा. रा. विश्वनाथ पाण्डुरंग भडकमकर ह्यांनीं चालींची फारच सुरस देणगी दिली ! नाटक लिहीत असतां व बसवीत असतां 'मनोहर' कम्पनीचे मालक व माझे प्रिय मित्र रा.रा. तवनाप्पा शेट चिवटे ह्यांचें सर्वतोपरी साह्य झालें. ही सर्व स्मृति ह्या प्रसंगीं फारच आनन्द-दायक आहे आणि त्याचप्रमाणें नाटकाबद्दलची अनेक प्रकारची अवश्यक कामगिरी मोठ्या खुषीनें अंगावर घेणारे रा. रा. श्रीधर शंकर उर्फ (बळवन्त-राव ) मुजूमदार ह्यांचाही निर्देश ह्या प्रसंगी केला पाहिजे. रा. रा. कृष्णासा शिवरामसा कुकर ह्यांचें आपुलकीचें वर्तन तर विसरणें अशक्यच आहे. 'मनोहर' स्त्री संगीत मण्डळींतलि नटवर्गानें हें नाटक बसविण्याचे कामीं जो उत्साह दाखविला तोही लक्ष्यांत राहण्या जोगाच होता.

सदर नाटकांतील फोटोंचें काम सांगलीचे प्रसिद्ध फोटोग्राफर रा. रा. श्रीपतराव तात्या चिवटे ह्यांनीं केलेलें आहे. हें काम त्यांनीं फारच तत्परतेनें व अतिशय अल्प मुदतींत केलें ! तें किती सूबक झालेलें आहे हें वाचकांना सांगणें नकोच !

नाटकांतील उर्दू भाषा साफसूफ व प्रौढ करण्याचे कामीं मे. शेख, एंजिनीयर, कोल्हापूर, ह्यांची अप्रतिम मदत झाली. ही मदत त्यांनीं केवळ निःस्पृह बुद्धीनें व स्नेहभावानें केली हें कळवि-ण्यास फार आनंद वाटतो. मे. शेख हे लवकरच अमेरिकेंत ज्यास्त ज्ञानलाभाकरितां जाणार आहेत त्याचे अगोदर त्यांच्या साहाय्याचा लाभ घडला हा अलभ्य योगायोगच ह्मटला पाहिजे.

अखेर पुन्हां एकदां महाराष्ट्रीय वाचकांस ही सेवा सप्रेम सादर करून त्यांची रजा घेतों.

मुंबई.
७–८–२६

अच्युत बळवन्त कोल्हटकर.

जय श्री हिन्द माता

# संगीत मस्तानी नाटक

[ राजा छत्रसालची राजधानी. राजवाड्याजवळील एका बगीच्यांत राजकन्येच्या सख्या जमलेल्या आहेत. त्या निरनिराळे नाच करीत मंगलाचरणाचीं पदें ह्मणत आहेत. ]

पद १ लें

( चाल—जावोशाम जावो )

गा हिन्द्माय । ध्याति पाय । रंकराय । लीनकाय । कीर्ति गाय । होइं बालकां सहाय ॥ ध्रु० ॥ विमल नाम वेइ ठाय । भूमिगोल भरुनि जाय । प्रियहि जगतिं अन्य काय ? होसि बालकां सहाय ॥ १ ॥

पद २ रें

( चाल—माई खेलुंगी गुलाल )

प्राणां ओवाळूं अमोल । हिन्द्गोल–सौख्यलोल । हे जननि तुझ्याकरितां । खरा खरा पण हा केला ॥ ध्रु० ॥ प्रेमा हृदयीं सर्वपरी । हा देह तरी । निर्वाण करी । सन्देश, सन्देश, सन्देश ॥ प्रेमल उज्ज्वल सन्देश । वेगें येवोनी । कानीं पहा कोन्दाटला । जनिं भरला । मनिं शिरला । दिनरजनी । त्रिकाला ॥ १ ॥

एक सखी—गडे, आपण असं करूं !

दुसरी सखी—कसं ग ?

तिसरी सखी—ती बघ राजकन्या पदमकुंवर.

चवथी सखी—आणि ही बघ मस्तानी.

१ ली—त्या बघ निरनिराळ्या लतिकांशीं खेळत इकडेच येत आहेत.

२ री—अगबाई, खरंच कीं !

३ री—अग, खरंच काय म्हणतेस ? त्या लतिकाच ह्यांच्याशीं खेळताहेत असं ह्मण !

४ थी—अग, असं देखील नाहीं ! कवीला पाह्यलं ह्मणजे जशी त्याची स्फूर्ति भरारते, चन्द्राला पाह्यलं ह्मणजे जशी समुद्राची लाट उचम्बळते, वीराला पाह्यलं ह्मणजे जशी त्याची तरवार हलूं लागते, वाऱ्याच्या झुळके· बरोबर जशी नौका चळते, त्याप्रमाणें ह्यांना पाह्यलं ह्मणजे प्रत्येक लतिकेला प्रेमाचं वारं भरतं आणि ती ह्यांच्याबरोबर फुगड्या खेळूं लागते.

१ ली—ह्मणूनच मी ह्मणतें कीं आपण फुगड्या खेळूं या !

३ री—हो, मला तर असं वाटतं कीं फुगड्या ह्मणजे प्रेमनाटकाची एक रंगीत तालीमच आहे !

पद ३ रें

( चाल—चल हरि खेळुं रंग )

चल गडे झणिं खेळ फुगडि फू फू ।। धृ० ।। पति येवोनि हा कर धरणार ग । रंगि तालीम त्याची जमणार ग ।। १ ।। चल० ।। हातीं हाताहि हे गुंफूं पति कर धरितां नच कम्पूं । नच करूं त्याशीं गड्डि फू फू ।। २ ।। चल० ।।

२ री—तुला असं वाटतं कीं काय कीं ह्या लतिकांप्रमाणं तूं सुन्दर आहेस ?

१ ली—कां बरं, मी सुन्दर नाहीं असं तुला वाटतं कीं काय ? मी किनी गुलाबाच्या ताटव्याप्रमाणं देखणी आहे. अग मी गुलाबाच.

पद ४ थें

( चाल—किति हें गोंडस राजस मूल )

**सखि मी नाजुक साजुक फूल । शोभतसे गुलाब कीं गुलगुल ।। धृ० ।। हास्य पाहिलें कोणि ग माझें पडे तयातें भूल गे । प्रेमें मदनें मजला केलें । कानींचा बघ डूल गे ।। १ ।।**

[ बाजीराव मदनवेषांत प्रवेश करतो. तो येतांना पाहून सर्व सख्या एकीकडे होतात. ]

बाजी—( स्वगत ) ह्मणजे मी आलों तरी कुठं ? मी लताकुंजांत नाहीं का आलों ? ह्या लता नव्हेत का ? काय ह्या लता नव्हेत ? ह्या मनोहर पऱ्या ? अरे, पण लतिकांप्रमाणं ह्या हलताहेत ! ( किंचित् पाहून ) छेः, पण पऱ्यांप्रमाणं बोलताहेत ! ह्या पऱ्या कीं लता ? ह्या लता कीं पऱ्या ? छेः ! मी तर अगदीं गोन्धळून गेलेलों आहें ! ह्या राज्यांतल्या ललना लतिकांप्रमाणें सुन्दर आहेत कीं लतिका ललनांप्रमाणं बोलक्या आहेत ? काय, आहे तरी काय ? पुण्यांतल्या सुन्दर परींनो, तुह्मीं किती जरी लचकलांत, ठुमकलांत, लवलांत, फुललांत, तरी लक्ष्यांत ठेवा कीं, तुमच्याप्रमाणेंच जादुगारणी ह्या छत्रसाल राजाच्या नगरांतही आहेत !

पद ५ वें

( चाल—शाम मोरे पिया )

होंचि वाटे पुणें । किमपि नाहीं उणें ॥ धृ० ॥ मृदु नाज़ुक ओंठ । मधुर साखरखडा । डोळ्यासि डोळा । सुधा-सौख्य-धारा ॥ १ ॥

( पडद्याकडे पाहून ) अरे, पण हें काय ? ह्या दोन चन्द्रकला कशा उगवल्या ? सृष्टीनं आपल्या वेणींत एकच चंद्रफूल ठेवल्यामुळं तिचं समाधान झालं नाहीं ह्मणून का हीं दोन चन्द्रफुलं निर्माण केलीं ?

पद ६ वें

( चाल—संया बोलोजि नाहिं )

जणुं अवनि घालि नव गजरा । गमे तिजासि सुख । नभीं बघत मुख । दर्पणिं सुन्दर हारा ॥ धृ० ॥ श्रवणीं चमके कुडी हिऱ्याची । खोवि वेणिमाधिं केतका । केशपाशीं ही दोन ठेविते । चन्द्रफुलें नवदारा ॥ १ ॥

[ तल्लीन होऊन एके बाजूला होतो. मस्तानी प्रवेश करते ]

मस्तानी—( स्वगत ) कुठें पाहूं ? स्वारीला कुठें पाहूं ? त्या दिवशीं मेजवानीला स्वारी आली आणि स्वारीनं माझं मन माझ्यापासून कायमचं हिरावून घेतलं !

पद ७ वें

( चाल—आली आली राधा भोळी )

मेजवानीला स्वारी आली। डोळे भरून पाहियली। तनु घामाघूम झाली। पदर ओला ॥ ध्रु० ॥ वाटे तोची पुढें उभा । वाटे तोची प्रेमगाभा। वाटे जीवनाची शोभा। रमण माझा ॥ १ ॥ तोचि माझा नाथ प्यारा। जीव त्याचे साठीं सारा । घालीतसे येरजारा । मदन राजा ॥ २ ॥

माझ्यापासनं माझं मन तेव्हांपासनं कायमचं गेलं ! गडे, ' माझं मन मला परत द्या ' अशी मागणी करायला जर मला स्वारीच्या जवळ जायला सांपडलं तर केवढी मजेची गोष्ट होईल ? पण ही मजेची गोष्ट व्हायची कशी ? सावकारानं कुळाला कर्ज दिलं तर तें कर्ज परत मागायला जायला सावकाराला अधिकार असतो—पण एखाद्या तरुणीचं मन एखाद्या तरुणानं हिरावून नेलं तर तें परत मागायला कांहीं तरुणींना त्यांच्या जवळ जातां येत नाहीं ! काय हा तरुणींवर अन्याय !

पद ८ वें

( चाल—रतिया कैसे कटेरी )

राहूं सखया समोरीं। अनया कैसी कुमारी ? ॥ ध्रु० ॥ चित्त हरुनियां। प्रेम भरुनियां। नाथ विराजत मन्दिरीं। 'मन अजि माझें । देइं मला तें'। केंवि वदूं अविचारीं ॥ १ ॥

[ ती नादांत एकीकडे जाते. पद्मकुंवारी प्रवेश करते. ]

पद्म०—( हंसून) ( स्वगत ) ही अलीकडे किती भ्रष्ट झालेली आहे ! सदा सर्वकाळ नादांत असते. कधींही भानावर असत नाहीं ! हिचं

हें भान कुणीं हिरावून नेलेलं आहे बरं ? ( पुन्हां हंसून ) पण हें सांगायला का पाहिजे ? ज्यानं माझं भान हिरावून नेलं त्यानंच हिचंही भान हिरावून नेलं ! ही पद्मकुंवर आणि ही मस्तानी—ह्या दोहोंचा अपराधी एकच ! आणि तो वीरशिरोमणि बाजीरावच ! राजद्रोहाचा एक अपराध केला तरी मनुष्याला कडक शिक्षा होते—पण ह्या बाजीरावानं दक्षिणेतनं येऊन दोन राजकन्यांचा अपराध केलेला आहे खरोखर.

पद ९ वें

( चाल—दिल ले लिया मेरा )

भूपतीची दुहिता केंवि छळाया सजला हा । साहेना बाई ताप तयाचा मजला हा ॥ धृ० ॥ जरि 'बन्दींत तया । घालुं' ह्मणुनि ठेवुं अहा ! । करि मज हाचि कसा । धूर्त नजरबन्दि पहा हा ! ॥ १ ॥ कीं घाल जरि मोठी । बेडीच तयाच्या करपाशीं । प्रियकण्ठीं बाहू । प्रेमभरानें शिरला हा ॥ २ ॥ ( एकीकडे होते. )

मस्तानी—( पुढें होऊन ) ( स्वगत ) राव, तुह्मी न्यायी ह्मणवतां—महंमद बंगषपासनं बुन्देलखण्डचं राज्य वांचवायला तुह्मी आलांत—पण तें राज्य वांचिवतांना ह्या मस्तानीच्या हृदयावर मोठमोठ्या जखमा करायला तुह्मी चुकलां नाहींत ! ह्याला न्याय ह्मणतात का ? राव, ह्याला न्याय ह्मणतात का ? ( एकीकडे होते )

पद्म०—( पुढें होऊन ) छेः छेः हिच्या ह्या जखमा बघितल्या ह्मणजे माझ्या जखमांची मला आठवण होते ! जी हिची जखम तीच माझी जखम ! ज्या हिला वेदना—त्याच मला वेदना ! हिच्या आणि माझ्या दुखण्यावर धन्वन्तरी एकच—आणि तो बाजीरावच ! त्या धन्वन्तऱ्याला मी कुठें सोधूं ? त्याला कुठें जाऊन भेटूं ? ( जाते )

मस्तानी—( पुढें होऊन ) ( स्वगत ) ह्याला न्याय म्हणतात का ? राव, ह्याला न्याय ह्मणतात का ?

[ बाजीराव पुढें होतो. ]

मस्तानी—( चपापून ) अग बाई ! कोण हे ? ते—तेच का ? ( मूर्च्छित पडते. बाजीराव तिला हातावर झेलतो )

बाजी०—( आनन्दनिमग्न होऊन ) हेंच—हेंच आयुष्यांतलं गुलाबी कोडं ! हें कोडं झेलल्यामुळें माझा बाहु कसा सर्वांग गुलाब बनून गेलेला आहे ! ही गुलाबाची झालर माझ्या बाहुवर टेंकलेली—आणि माझा बाहु सर्वांग गुलाब बनून गेलेला—ह्यामुळें मला चोहोंकडे गुलाबच गुलाब दिसूं लागलेला आहे ! गुलाब—गुलाब—माझा गुलाब—

मस्तानी—( शुद्धीवर येत येत ) कोण हें ? मला आपल्या बाहूचा आधार देणारं कोण हें ?

बाजी—( तिचा घाम पुशीत ) दुसरं कोण असणार ? इतक्या सुन्दर जिवानं आधार मागितल्यामुळें स्वतःला धन्य धन्य समजणारा हा बाजीराव !

मस्तानी—( पूर्ण शुद्धीवर येऊन दूर सरते ) कोण ? कोण ?

बाजी०—( हंसत ) कोण ह्मणजे ? हा बाजीराव ! तुझ्यावर आषक झालेला हा बाजीराव ! तुझ्यावरनं प्रेमाची आरती ओवाळणारा हा बाजीराव !

मस्तानी—( आतुरतेनें ) हें काय ऐकतें मी ?

बाजी०—हें माझं हृदय तूं ऐकते आहेस ! मस्तानी, माझ्या जिवाची हांक तूं ऐकते आहेस ! माझ्या पंचप्राणांचे पंच बोल तूं ऐकते आहेस !

मस्तानी—( साशंकपणानें ) छेः! मला खरं नाहीं वाटत !

बाजी०—तुला खरं वाटत नाहीं ? मग माझं दुर्दैव !

मस्तानी—तरुण पुरुषांची वाणी खरी नसते !

बाजी०—पण शिपाई लोकांची वाणी खरी असते ! मस्तानी—मी तरुणही आहें आणि शिपाईही आहें ! आह्मी शिपाई गडी आपले प्राण वेंचूं, पण आपली वाणी कधींही खोटी करणार नाहीं !

मस्तानी—राव, मी मुसलमान आहें.

बाजी०—मीही ब्राह्मण आहें ! मुसलमानांत जर खरं इमान असलें तर ब्राह्मणांतही खरं इमान आहे ! ब्राह्मणाचे मुखांतून खोटी वाणी कधींही निघणार नाहीं—खोटी वाणी उच्चारणारा कुणीही मनुष्य स्वतःस ब्राह्मण ह्मणवून घेणार नाहीं !

मस्तानी—राव, अन्तःकरण विश्वास ठेवतं—तारुण्य विश्वास ठेवतं—प्रेम विश्वास ठेवतं—पण जात विश्वास ठेवीत नाहीं !

बाजी०—अग, प्रेमाच्या दरबारांत जात कसली ? प्रेम हा एक एवढा मोठा सम्राट् आहे—एवढा मोठा बादशहा आहे—एवढा मोठा विश्वजेता आहे—कीं त्याला जातगोत कांहीं नाहीं ! प्रेम चक्रवर्ती अन्तःकरणाकडे पहातें—जातीकडे पहात नाहीं !

मस्तानी—राव, पुन्हां एकदां बोला कीं हें सारं खरं आहे !

बाजी०—होय, हें सारं खरं आहे ! अगदीं खरं आहे ! ह्यांतलं एक अक्षर देखील खोटं नाहीं !

मस्तानी—खोटं नाहीं ना ? नाहीं ना ? मग राव, मी आपली आहें—आजपासनं मी सर्वस्वी आपली आहें ! ( बाजीरावाला प्रेमालिंगन देते इतक्यांत पदमकुंवारी येते व एकीकडे उभी राहून पहाते. )

पदम०—( स्वगत ) बुन्देलखण्डांतल्या मराठी शिकाऱ्या, शिकार साधलीस ! हिन्दु कुटुम्बांतील मुसलमान बहिणी, तूंही शिकार साधलीस ! पदमकुंवारी, तूं मात्र शिकार गमावलीस—शिकार गमावलीस !

( आच्छादक पडदा पडतो. पदमकुंवारी पडद्याचे बाहेर येऊन )

पद १० वें

( चाल—प्यारि तोरि श्यामा )

**प्राणसखा झाला झाला पारका ॥ धृ० ॥ हृदयभेदि मदनबाण । घेइ प्राण घेइ प्राण । जगतीं त्यातें कोणी कोणी वारि का ? । बोल तिळ न मनहारका । बाई साऱ्या । भोळ्या भोळ्या बायका ॥ १ ॥**

( पडदा पडतो. )

———

## अंक पहिला

### प्रवेश दुसरा

[ रोशन बिब्बी धावडशी गांवांतील एके बाजूचे रस्त्यावर प्रवेश करते ]

रोशन—( स्वगत ) वो कहां गया ? मेरा खाविन्द कहां गया ? मैं सुनती हूं के वो यहां आया है और बम्मन बन गया है ! अफसोस ! अफसोस ! क्या ? मेरा खाविन्द बम्मन् ? इस रोशन बिब्बीका खाविन्द बम्मन् ! मर गई ! अब मैं मर गई ! ( पडद्याकडे पाहून ) ये कौन ? या अल्ला ! ये कौन ! यही तो नहीं मेरा खाविन्द ? डाढी वाढी निकालके इसने अपना रूप इतना साफसूफ बनाया हैं कि अब क्या कहूं ? ( नाजूक व बारीक आवाजांत ) अन् मैं क्या कहूं ? ( एकीकडे होते )

[ ॲण्टोनियो ब्राह्मणाचे वेषांत प्रवेश करतो ]

ॲन्टो—( स्वगत ) छेः ! काय बेटा हा ब्राह्मणांचा धर्म ! दमलों ह्यांच्या ह्या कवायतीखालीं ! अहो, इथें सकाळीं उठलं कीं प्रातःस्मरामीपासनं सुरवात ! कोणतीही एखादी गोष्ट करायची कीं तिच्यासाठीं मंत्र ! मंत्राशिबाय जेवायचं नाहीं—मंत्राशिवाय खायचं नाहीं—मंत्राशिवाय बसायचं नाहीं—मंत्राशिवाय उठायचं नाहीं-मंत्राशिवाय जन्मायचं नाहीं—कीं मंत्राशिवाय मरायचं नाहीं ! अहो, परवां मला नुसती एक शिंक आली ! त्याबरोबर माझ्याजवळ बसलेले ब्राह्मण लोक लागले ‘ शतं जीव ’ ‘ शतं जीव ’ म्हणायला ! अरे, मंत्राशिवाय मला शिंकूं द्या तर खरं ! पण छेः नाहीं ! इकडे शिंकेनं माझा चाललाय् प्राण ! आणि मारे ह्यांचा चाललाय् ‘ शतं जीव, ’ ‘ शतं जीव ’ असा सपाटा ! अहो, कसला आलाय् शतं जीव न् कसलं आलंय् काय ? ह्या ‘ शतं जीवा’ खालींच प्राण गुदमरून जायचा ! मग शम्भर वर्षं जगायची आशा कुठली ?

[ रोशन बिब्बी पुढें होते ]

रोश०— ( त्याच्या तोण्डाकडे पाहून स्वगत ) क्यं ? ये होगा मेरा खाविन्द ?

ॲण्टो०— ( स्वगत ) अरेच्या ! ही बाईशी माझ्या तोण्डाकडे बघतीय् ! हिनं जर माझ्या तोण्डाकडे फार वेळ बघितलं—तर मला एखादा मंत्रच ह्मणावा लागेल !

रोशन०—ऐसा बराब्रा बम्मन् बन गया हैं के मैं पैछान् नहीं सकती !

अण्टो०— ( स्वगत ) अरेच्या ! ही फार बघायला लागली ! छेः ह्मणावाच एखादा मंत्र ! ' आपो हिष्टा मयो भुवः ' ( मार्जन करायला लागतो, पण पळीनें पाणी उडवितांना तें चुकून रोशन बिब्बीच्या अंगावर उडतें )

रोश०— ( स्वगत ) यही मेरा खाविन्द ! मुझे देखतेही कैसी मस्करी करने लगा ! ( आनन्दानें ) मैं मरगई ! अब् मैं मरगई !

ॲण्टो०—( स्वगत ) काय मुखडा आहे पण मारू ! जणुं कांहीं भागा नगरचं पांखरूंच ! थोडंसं आणखी पाणी उडवावं कीं जरा ज्यास्त चमकायला लागेल ! ( पुन्हां 'आपोहिष्टा' ह्मणून पाणी उडवितो. )

रोश०— ( उघड ) आय् रे मेरी जान ! आय् रे मेरा प्रान ! मैं तो तुझपर कुरबान !

ॲण्टो०—( स्वगत ) ( आनन्दानें ) अरे ! ही तर खुलली ! च्या आपोहिष्टाचं पाणी बायकांच्या गालांवर उडालं ह्मणजे त्या इतक्या खुलतात हें नव्हतं आपल्याला माहिती ! आहे ! ब्राह्मणांच्या मंत्रांत कांहीं तरी पाणी आहे ! हे नुसते मंत्रच नव्हेत—तर ह्यांत बरंचसं तंत्रही आहे !

रोश०—( लाडानें ) खाविन्द ! मेरे खाविन्द !

ॲण्टो०—( दचकून ) ( स्वगत ) खाविन्द ! अरे वाः ! हिनं एका क्षणांत मला खाविन्द देखील बनवलं !

रोश०—( लाडानें जवळ जाऊन ) खाविन्द, मेरे साथ बोलते क्यं नहीं ? मेरी तर्फ देखते क्यं नहीं ?

ॲण्टो०—( स्वगत ) बोलते क्यं नहीं ? देखते क्यं नहीं ? अरे बाप, बाप, बाप ! हें पांखरूं पाहून मला अगदीं मुसलमान व्हावंसं वाटायला लागलेलं आहे !

रोश०—खाविन्द, मेरे खाविन्द—

ॲण्टो०—( त्याच आवाजांत ) बिब्बी, मेरी बिब्बी—( पश्चात्ताप पावून ) ( स्वगत ) अरे ! हें मीं काय केलं ? ( घाईघाईनें ) आपोहिष्ठा मयो भुवः ( तिचे अंगावर ज्यास्त पाणी उडतें )

रोश०—( लाडानें ) मत मारो पिचकारी—

ॲण्टो०—( स्वगत ) जय रघुवीर ! इथें तर अगदीं जलसाच उडालाय् !

रोश०—( लाडानें ) ऐसा पानी नहीं उडाना भला ! खाविन्द, ऐसा पानी नहीं उडाना !

ॲण्टो—( स्वगत ) पानी नहीं उडाना ! अग, पाणीच काय, इथें माझा जीवच उडून जाण्याच्या बेताला आलेला आहे !

रोश०—( लाडानें ) ऐसा पानी उडावोगे तो मैं भीग जाऊंगी !

ॲण्टो०—( स्वगत ) मैं भीग जाऊं गी ? अग इथें तर माझ्या हृदयाचंच पाणी झालेलं आहे !

रोश०—खाविन्द, तुम ऐसे बम्मन् कबसे बन गये ?

अण्टो०—( स्वगत ) बन गये ? ह्मणजे मी ब्राह्मण नाहीं हें हिनं ओळखलं कीं काय ?

रोश०—( लाडानें ) डाढी क्यं निकाली ?

ॲण्टो०—( घाबरून ) डाढी ? ( स्वगत ) अरे ! मी गोव्याचा शुद्ध किरिस्तांव आहे हें हिनं खरोखरच ओळखलं !

रोश०—( लाडानें ) खाविन्द, मुझे क्यं छोडा ? खाविन्द, मुझे क्यं छोडा ?

ॲण्टो०—( स्वगत ) अरे, अरे, अरे ! हें लचाण्ड अंगाशीं यायला करतंय ! ( उघड ) अहो बाई, लाम्ब व्हा !

रोशन -( हंसून ) ( मराठी बोलण्याचा प्रयत्न करते ) अहो बाई ! खाविन्द इसका क्या मायना ? 'लाम्ब' मायने क्या ? ये कौनसी बोली ?

ॲण्टो०—कौनसी बोली ? ये है मराठी की चाली !

रोश०—मरेठी ? मरेठी मैने क्या ?

ॲण्टो०—मराठी म्हणजे माझं बोडकं ! ( स्वगत ) हिनं ये क्या, ते क्या असं सुरू केलं म्हणजे मी तरी किती टिकणार हिच्याबरोबर ?

रोश०—( जवळ येऊन ) खाविन्द, ( लाडानें ) मरेठी मैने क्या ?

ॲण्टो०—अग एकदा तुला सांगितलं ना ? कीं मराठी म्हणजे माझं बोडकं !

रोश०—( त्याचा हात धरून ) ( लाडानें ) खाविन्द, बोडखा मैने क्या ?

[ इतक्यांत कोकिळा मावशी स्नान करून हातांत पूजापात्र घेऊन सोंवळ्यानें उड्या मारीत मारीत प्रवेश करतात. ]

कोकिळा—( ॲण्टोनियोकडे पाहून ) अन्तुभट, अन्तुभट, चांगलं चाललंय् इथें !

ॲण्टो०—( लाजून स्वगत ) अरे, अगदीं भलत्या वेळीं ह्या कोकिळा मावशी इथें आल्या !

कोकिळा०—म्हटलं चांगलं चाललंय् इथें !

रोश०—( मोठ्यानें हंसून ) ( स्वगत ) क्या ये लोगोंकी बोली ? च्यांगलं च्यालंलय् इथें ! च्यांगलं च्यालंलय् इथें ! ( पुन्हां मोठ्यानें हंसते )

कोकि०—काय मेलं हें हंसणं ! ( हंसून ) मेलं हें हंसणं न् हें खिद-ळणं—अन्तुभट, शोभतं का हो सारं हें ?

ॲण्टो०—( लाजून ) कोकिळा मावशी, मी कांहीं हंसत नाहीं! ही बाई हंसतीय् मघांचपासनं!

कोकि०—अन् हें हात धरणं! अन्तुभट, जात तरी कोण ह्या बाईची?

ॲण्टो०—मावशी, ही मुसलमानीण दिसतीय्!

कोकि०—दिसतीयू! दिसतीय् म्हणे! जणुं कांहीं ही तुमच्या ओळखीचीच नाहीं! ( मुरका मारते )

ॲण्टो०—खरोखर, ही माझ्या ओळखीची नाहीं! देवाशप्पत ही माझ्या ओळखीची नाहीं! आईशप्पत–गाईशप्पत!

कोकि०—( हंसून ) अग बाSSSई! काय मेल्या ह्या शपता! अन्तु-भट, काय ह्या खोट्या शपता घेतां हो! अहो, ही तुमची ओळखीची असल्याशिवाय का हें हात धरणं? इश्श! जळ्ळं मेलं लक्षण हें? ( पुन्हां मुरका मारते )

रोश०—( हंसू लोटून ) ज्यल्ला मेला लक्शुमन तो–ज्यल्ला मेला लक्शुमन तो! ( हुबेहुब तिच्यासारखा मुरका मारते ) खाविन्द—

कोकि०—खाविन्द, अन्तुभट हेंही सुरू झाले का आणखी?

ॲण्टो०—कोकिळा मावशी, मी कांहीं ह्या मुसलमानणीचा हात धरलेला नाहीं! ह्या मुसलमानणीनं मात्र माझा हात धरलेला आहे!

कोकि०—अस्सं का? ह्या मुसलमानणीनं तुमचा हात धरला का? ( हंसून ) म्हणतात ना? अग अग म्हशी न् मला का ग नेशी? अन्तुभट, समजलं तुमचं सारं बिंग! आतां जातें न सगळ्या गांवभर सांगतें कीं ह्या अन्तुभट अस्सा आहे!

ॲण्टो०—कोकिळा मावशी, मला क्षमा करा, कोकिळा मावशी, मला क्षमा करा! ( तिचे पाय धरायला जातो )

कोकिळा०—लाम्ब व्हा, विटाळ होईल मला. बाई, जरा लाम्ब हो अं! माझं लुगड विटाळेल. छेः बाई भ्रष्टाकार–अगदीं भ्रष्टाकार माजलाय्

चोहोंकडे ! कलियुग बरं हें ! कांहीं करा ह्या कलियुगाप्रमाणं आपलं तसं तसं व्हायचंच ! मग तुह्मी देवळं बान्धा, नाहीं तर रावळं बान्धा ! अगदीं ब्रह्मयाला–ब्रह्मयाला देखील नाहीं टाळतां यायचं हें ! मग आह्मी तर काय ?–ह्या अशा झालेल्या बायका ! ( मुरका मारून पडद्यांत जाते )

ॲण्टो०—कोकिळा मावशी, मला क्षमा करा, कोकिळा मावशी मला क्षमा करा ! ( तिचे पाठोपाठ पडद्यांत जातो )

रोश०—( हंसून ) क्या है मजा ! मालुम नहीं पडता कि ये कोकिला मावसी मरद है या औरत है ! दिखती है तो औरत ! लेकिन् थोडा ठाठ् मर्दकाभी दिखता है ! मालूम नहीं होता ये क्या जादु ! ये धावडसी जैसा कि एक जादुका बंगला है ! यहा: सब मामिला उलटथुलटा है. ऐसी हालतमे मेरा खाविन्द मुझे भूला और मुझपे बदल गया इसमें क्या बडी बात है ?

पद ११ वें

( चाल–आ आ प्यारे बुल बुल )

हां हा कैसा आया जमाना बुरा । हाय फिरफिर बुलावूं न सुनतें जरा ।। ध्रु० ।। ये बाग जंगल्कि तऱ्हा कभी नहीं फुलता । बसन्तमें आभि फूलन्में बू नहीं मिलता । बुलबुल् का दिल्से गला यहां नहीं खुलता । लगी है आग पिया बिना जिया जलता ।। १ ।। हाय फिर फिर० ( जाते )

---

अंक पहिला

प्रवेश तिसरा

[ राजा छत्रसाल ह्यांचा दरबार. राजा छत्रसाल, त्याचे दोन मुलगे व बाजीराव ह्यांचा प्रवेश. पदमकुंवारी व मस्तानी ह्या दोघी माडीवर बसलेल्या आहेत. ]

( पडद्यांत नगारा वाजतो. शिंगें फुंकलीं जातात. सनया सुरू होतात. )

बाजी०—राणाजी, आतां मला रजा मिळावी !

छत्र०—नाहीं, इतक्यांत नाहीं ! आपल्याला रजा द्यायच्या अगोदर आणखी एक गोष्ट करायची राह्यलेली आहे !

बाजी०—कोणती ती ?

छत्र०—( चान्दीच्या नळकण्ड्यांतून एक सनद काढतो ) जायच्या पूर्वी ही घ्या.

बाजी०—( आश्चर्यानें ) काय हें ? राणाजी, काय हें ?

छत्र०—ही आपली सनद ! ह्या सनदेनं माझ्या राज्याचा तिसरा हिस्सा आपल्याला दिलेला आहे !

बाजी०—राणाजी, काय हें ?

छत्र०—बाजीराव, महंमद बंगषनं माझ्या राज्यावर स्वारी केल्या-बरोबर

जो गति जाह गजेन्द्रकी
सो गति भइ है आज
वाजी जात बुन्देलकी
राखो बाजी लाज

म्हणून जें आपल्याला मी पत्र लिहिलं, त्याप्रमाणें आपण धांवून आलां म्हणूनच आज मीही जिवन्त आहें व माझं संस्थानही जिवन्त आहे ! बाजीराव, ह्या वेळीं यायला तूं एक क्षणभर जरी उशीर केला असतास तरी माझा निभाव लागला नसता ! तूं मला उपकारांनीं भारून टाकलं आहेस ! ( बाजीरावाचे पाठीवरून हात फिरवून ) तूं माझा पुत्र आहेस, एवढंच नव्हे तर तूं माझा प्राण आहेस, तूं माझा आत्मा आहेस.

पद १२ वें

( चाल--हास हसन हुस्न हे न्यारा )

खचित सुत गमसी मजला । मजसाठीं धांवें समयाला ॥ ध्रु० ॥ तनय तोचि जगतीं शोभला । संकटिं जो करि पालना भला । निजान्तरीं भाव हा उचित ॥ १ ॥ खचित सुत० ॥

छत्रसालांचा वडील मुलगा—पिताजींचें ह्मणणं खरं आहे !

छत्रसालांचा धाकटा मुलगा—मग काय करावं असं तुमचं ह्मणणं ?

१ ला—आह्मां तिघांत बाजीरावसाहेब हेच आपले ज्येष्ठ पुत्र आहेत. त्यांना खुशाल सर्व राज्य देऊन टाका.

२ रा—होय पिताजी, त्यांनाच सर्व राज्य द्या.

छत्र०—शाबास ! शाबास ! पण तुह्मांला राज्य नको ?

१ ला—नको, आह्मी बाजीरावसाहेबांचे बरोबर जाणार !

२ रा—आणि मराठ्यांच्या स्वातंत्र्यसैन्यांत शिरून हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा झेण्डा सर्वत्र फडकावणार !

बाजी०—( गादिंवरून ) शाबास बन्धूनो ! शाबास ! मराठ्यांच्या राज्यविस्ताराचं बरोबर मर्म ओळखलंत ! मराठ्यांचा राज्यविस्तार मुलूख मिळविण्याकरितां नाहीं, सत्ता गाजविण्याकरितां नाहीं, लुटालुटीकरितां नाहीं दुसऱ्यांना गुलामगिरींत ढकलण्याकरितांही नाहीं ! मराठ्यांचा राज्यविस्तार केवळ हिन्दुस्थानच्या स्वातंत्र्याकरितांच आहे !

१ ला—आणि ह्मणूनच आह्मी आपल्याबरोबर येणार !

२ रा—आणि मराठ्यांच्या स्वातंत्र्यसैन्यांत दाखल होणार !

बाजी०—तरी पण राणाजी, मला आपलं सगळं राज्य नको आहे !

छत्र०—( कौतुकानें ) कां बरं ?

बाजी०—राणाजी, दुसऱ्यांना राज्यावरनं काढण्यांत आह्मां मराठ्यांना आनन्द नाहीं—दुसऱ्यांना राज्यावर बसलेले पाहाण्यांतच आह्मां मराठ्यांना आनन्द आहे.

छत्र०--वाः ! काय ही थोर राजनीति !

बाजी०—राणाजी, आपण आपल्या राज्याचा दिलेला तिसरा हिस्सा देखील मी घेणार नाहीं !

छत्र०—नाहीं, नाहीं, तो तुला घेतलाच पाहिजे.

बाजी०—माझ्या स्वतःकरितां तर तो मी कधींही घेणार नाहीं. राणाजी, स्वतःकरितां इनाम घेण्याची आम्हां मराठ्यांची पद्धति नाहीं. आम्ही जें कांहीं करतों तें केवळ राष्ट्राकरितां ! राष्ट्राकरितां आमचं आयुष्य आहे--ह्या महाराष्ट्राकरितां आमचं आयुष्य आहे.

पद १३ वें

( चाल—जाना है आज मक्का और मदीना )

हें जाण सर्व कांहीं । राष्ट्रार्थ पाहीं ॥ धृ० ॥ देशासाठीं तनमन वाहीं । मनिं दुजें नाहीं । राष्ट्रार्थ सर्व मन । हे प्राण शस्त्र हेंही ॥ १ ॥

छत्र०—ठीक आहे, तर बुन्देलखण्डाचा हा तिसरा भाग महाराष्ट्राकरितां आज मीं अर्पण केलेला आहे—आज महाराष्ट्राचे भवितव्यतेंत बुन्देलखण्ड प्रान्त सामील झालेला आहे. बुन्देलखण्ड आणि महाराष्ट्र ह्यांची ही दोस्ती कायमची टिको व आज एकमेकांत सामील झालेले त्यांचे प्राण एकमेकांसाठीं नेहमीं प्रदीप्त असोत.

बाजी०—राणाजी, असंच होईल ! एवढंच काय, पण महाराष्ट्राची अब्रू सातारा आणि पुणें हीं स्थळं जितकी सांवरून धरतील त्यापेक्षांही बुन्देलखण्डांतली झांशी महाराष्ट्राचं नांव ज्यास्त सांवरून धरील !

[ पदमकुंवारी व मस्तानी वरून त्याचेकडे प्रेमदृष्टीनें पहात त्याचेवर पुष्पवृष्टि करतात. पडदा पडतो. ]

## अंक पहिला

### प्रवेश चवथा

[ थावडशी येथील रस्ता. ॲण्टोनिया ( अन्तुभट ) व सुलेमान हातांत हात घालून प्रवेश करतात. ]

सुले०—मी कांहीं कुणी तसा खोटा वेष घेऊन आलेलों आहे असं समजूं नका. मी अगदीं अस्सल कोंकणी भटजी आहें. अहो, परशुरामाच्या वेळेपासून आमच्या सगळ्या पिढ्या कोंकणांत गेलेल्या आहेत.

ॲण्टो०—( हंसून ) हो, हो, दिसतंच आहे तसं ! तुमच्या चेहऱ्या-वरनंच तुह्मी अगदीं अस्सल कोंकणी भट आहांत असं दिसतंय् ! तुमच्या चेहऱ्यावरनं—

सुले०—( घाबरून, स्वगत ) हा पुन्हां पुन्हां चेहऱ्याचं नांव कशाला काढतोय् बरं ! माझ्या दाढीचा तर कांहीं भाग शिल्लक नाहींना राह्यला ! बाकी, मी अगदीं विसरभोळा आहें. एकदां घाईत मी एका बाजूची दाढी काढली आणि एका बाजूची तशीच ठेवली ! पुढें तसाच गेलों बाजारांत ! मग अशीं पोरं पाठीस लागलीं आहेत ह्मणतां कीं कांहीं विचारूं नका.

ॲण्टो०—अहो, तुमच्या चेहऱ्यावरनं मला असं वाटतं—

सुले०—कीं मी मुसलमान आहें ?

ॲण्टो०—( स्वगत ) अरे बेट्या ! हा मुसलमानच खास ! त्याशिवाय हा आपण होऊन असं बोललेला नाहीं !

सुले०—अहो, मी मुसलमान आहें असा संशय देखील घेऊं नका !

ॲण्टो०—छेः छेः असा संशय मी कसा घेईन ?

सुले०—माझ्या चेहऱ्यावरनं अगदीं बघूं नका. अहो, सगळ्यांचेच चेहरे सारखे कुठें असतात ? माझी बिब्बी तर—( स्वगत ) हाय, हाय ! घात झाला, घात झाला ! शेवटीं बिब्बीनं माझा गळा कापलाह्र !

अण्टो०—अहो मियांसाहेब, असे अडखळतां कां ?

सुले०—अहो, मी मियांसाहेब नाहीं ! मी अगदीं शुद्ध कोंकणी भट आहें.

अण्टो०—शुद्ध कोंकणी भट ! पण तुमची बिब्बी काय ह्मणाली तें तर सांगा आह्मांला ?

सुले०—अहो, बिब्बी नाहीं—बिब्बा—

ॲण्टो०—बिब्बा हें काय लचाण्ड आहे बोवा ! बिब्बा ह्मणजे नवरा कीं काय ? म्हणजे तुमची बायको ही तुमची बिब्बी आणि तुह्मी तिचा बिब्बा वाटतें ! मग हा बिब्बा जरा उताला जाणाराच दिसतोय् !

सुले०—अहो, तुह्मी अगदीं माणसाला बोलूंच देत नाहीं ?

ॲण्टो०—हं बोला—बिब्बा—बोला !

सुले०—अहो, मी असं ह्मणत होतों कीं माझ्या चेहऱ्यावरनं कुणीतरी तुमच्या मनांत माझ्याविषयीं बिब्बा घालील—पण त्यावर तुह्मी अगदीं विश्वास ठेऊं नका ! मी अगदीं शुद्ध कोंकणी भट आहें.

ॲण्टो०—बरं तसं का होईना ! कबूल कीं तुह्मी अगदीं शुद्ध कोंकणी भट आहांत !

सुले०—अहो, परशुरामापासून आमची कोंकणांत वस्ती आहे !

ॲण्टो०—परशुरामापासनं ? ठीक आहे, कबूल कीं परशुरामापासनं तुमची कोंकणांत वस्ती आहे. मग एक प्रश्न विचारूं का तुह्मांला ?

सुले०—हो, हो, खुशाल विचारा ! ( स्वगत ) या इलाही ! या रसूल ! या महंमद पैगम्बर ! अब तूंही मालिक है !

ॲण्टो—अहो, घाबरलां बिबरलां तर नाहीं ना ?

सुले०—छेः हो बिलकुल घाबरलेलों नाहीं ! खुशाल विचारा काय विचारायचं आहे तें !

ॲण्टो०—मग सांगा बरं, रामाची सीता कोण ?

सुले०—रामाची सीता कोण ? अहो, आई ! सीता ही रामाची आई ! सीता ही रामाची आई ! त्यांत काय एवढसं अवघड ?

ॲण्टो०—( हंसून ) आणि मारुती हा रामाचा कोण ?

सुले०—मारुती रामाचा कोण ? अहो, मारुती हा रामाचा चुलता ! रामाला त्याच्या बापानं राज्यावरनं घालवून दिलं ह्मणून त्याचा चुलता मारुती हा त्याच्या बरोबर वनांत गेला !

ॲण्टो०––वा, वा, वा, वा ! काय ही अपूर्व माहिती ! अहो, पण पाण्डव किती हो ?

सुले०––पाण्डव ना ? पाण्डव हे बाजेच्या खुराइतके तीन ! ( तो दोनच बोटें दाखवितो. )

ॲण्टो०––तुमची माहिती न् ज्ञान अगदीं अगाध आहे बोवा !

सुले०––अहो, त्यांत कांहीं नवल नाहीं ! आमच्या पिढ्यान् पिढ्या वेद ह्मणण्यांत गेल्या आहेत. वेद–उपनिषदं–कुराण––

ॲण्टो०––वेद, उपनिषदं आणि कुराण अं !

सुले०––( स्वगत ) च्‌च्‌च्‌ ! पुराणाच्या ऐवजीं कुराण झालं ! हें पुराण लक्ष्यांत रहावं ह्मणून पुरण ध्यानांत ठेवलं–कांहीं दिवस रोजच्या रोज पुरणपोळी करून खाल्ली ! पण शेवटीं घात व्हायचा तो झाला ! अफसोस, अफसोस !

ॲण्टो०––मिय्यासाहेब, आतां उगीच कशाला दडवितां ? अहो, अशा ह्या कच्च्या ज्ञानानं ब्राह्मण लोकांत तुमचा प्रवेश व्हायचा नाहीं ! खरं बोला माझ्याजवळ ! मी तुमचा दोस्त आहें. अल्लाची कसम आहे तुह्मांला !

सुले०––आपण कसमच घालतां ह्मणून कबूल करतों, नाहीं तर ह्या सुलेमानानं मान कटली असती तरी हें कुणाजवळ कबूल केलं नसतं !

ॲण्टो०––अहो, मी तरी ब्राह्मण कुठें आहें ?

सुले०––( आश्चर्यानें ) काय, तुह्मींही ब्राह्मण नाहीं ? छेः ! असं कसं होईल हो ?

ॲण्टो०––अहो, मी खरोखरच ब्राह्मण नाहीं ! मी गोव्याचा अगदीं अस्सल पोर्तुगीज आहें. माझं नांव ॲण्टोनियो ! पण इथें मला सारे लोक अन्तूभटजी ह्मणतात !

सुले०––अन्तुभटजी, तुह्मी फार वस्ताद आहांत बोवा ! पण काहो ब्राम्हण लोकांत मिसळायचं तुम्हांला साधतं आणि मलाच कां साधत नाहीं ?

ॲण्टो०—अहो, हा ब्राम्हणांचा धर्मच फार अवघड आहे !

सुले०—( वाईट तोण्ड करून ) तेंच तर वाईट आहे हो !

ॲण्टो०—हा नीट पाळायचा म्हणजे पहांटे उठावं लागतं !

सुले०—अरे बापरे !

ॲण्टो०—तिनिदां अंघोळ करावी लागते.

सुले०—त्यावेळीं फार थण्डी वाजत असेल नाहीं ? ( थण्डी वाजल्या-सारखें दाखवितो )

ॲण्टो०—उघड्यानं बसावं लागतं–संध्या करावी लागते–देवाला जावं लागतं !

सुले०—पण तिथें कुणी बायका बियका आल्या तर ?

ॲण्टो०—बायकाबियका आल्या तर त्यांच्याकडे ढुंकूनसुद्धां बघा-यचं नाहीं.

सुले०—अरे बाप ! मर गया ! अहो हें तर होणं फारच कठीण !

ॲण्टो०—अहो, ब्राम्हणांचा धर्मच तसा आहे. ह्याशिवाय श्राद्ध पक्ष, ग्रहण वगैरे आहे तें निराळंच !

सुले०—पण का हो, श्राद्धाला बसायचं तें विजार नेसून बसलं तर चालतं का हो ?

ॲण्टो—विजार ? श्राद्ध करायच्या वेळीं विजार ? वाः ! मग झालंच कीं ! अन् ह्मणे मी कोंकणचा ब्राह्मण आहें.

सुले०—मग काय, नुसतं धोतरच ?

ॲण्टो०—अहो, धोतरसुद्धां नाहीं ! ब्राह्मण झालं ह्मणजे पुष्कळ वेळां धाबळीच नेसावी लागते.

सुले०—काय धाबळी ? अरे बाप ! अहो, मला तर धाबळी ह्मटला कीं जणुं कांहीं कुणी फांसावरच चढवीत आहे कीं काय असं वाटतं !

ॲण्टो०—अहो, पण ब्राह्मणधर्म पाळायचा ह्मणजे हें सारं केलंच पाहिजे.

सुले०—( वाईट तोण्ड करून ) ठीक आहे. शिकवा मला ब्राह्मणधर्म !

ॲण्टो०—हं ह्मणा तर—केशवाय नमः

सुले०—केशवाय नमः

ॲण्टो०—नारायणाय नमः

सुले०—नारायणाय नमः

ॲण्टो०—माधवाय नमः

सुले०—माधवाय नमः

[ असें ह्मणत ह्मणत दोघेही पडद्याचे आंत जातात. नन्तर त्यांचे मागोमाग रुबी प्रवेश करते. ]

रुबी—ओ व्हेअर्स माय हबी ! व्हेअर्स माय लव्ह ? माझा ॲण्टोनियो ह्या घावडशीला आल्याचा पत्ता लागलेला आहे, आणि इथें तो अगदीं अस्सल ब्राह्मण होऊन राह्यलाय् ह्मणतात. ओ ! काय हें धाडस काय हें ॲडव्हेंचर ! पण माझा ॲण्टोनियो आहेच तसा ! ओ ! हौ आय् लव्ह हिम् ! धाडस ह्मटलं कीं माझ्या ॲण्टोनियोला असं स्फुरण येतं कीं कांहीं विचारूं नका.

ओ व्हेअर्स माय हबी
  व्हेअर्स माय लव्ह
ओ हौ आय् लव्ह हिम्
  हिम बाय जव्ह !
आय् सीक हिम नॉर्थ
  आय् सीक हिम सौथ्
आइल फाइण्ड हिम् किस् हिम्
  माउथ् टु माउथ् !

( पडद्याकडे पाहून ) वेल्, हा कोण इथें येतोय् ? हाच असेल का माझा ॲण्टोनियो ? ( कोकिळेच्या स्वरांत ) ॲण्टी—ॲण्टी—

[ कोकिळा मावशी पुन्हां प्रवेश करते ]

कोकिळा—हॉं मेल्यांनो, हा काय बाई त्रास ! आज आपली एक जातीय न् दुसरी येतीय् ! मुंग्यांच्या वारुळाप्रमाणें ह्या कुठल्या नव्या नव्या बायका आल्या आहेत आमच्या घावडशींत ?

रुबी—( कोकिळेच्या स्वरांत ) ऑण्टी, ऑण्टी !

कोकिळा—( आश्चर्यानें ) आमटी, आमटी, आमटी, करणारी ही कोण चिमुरटी ?

रुबी—( कोकिळा जवळ आलीसें पाहून तिच्याकडे निरखून पाहाते ) ओ ! व्हॉटा फन्न ! ( जोरानें जोरानें हंसायला लागते. )

कोकिळा—( गोन्धळून ) ( स्वगत ) अग बाई, ही हंसतीय् का इतकी ? ह्या हौस मावशीनं हंसरा हिंगुळ तर नाहीं खाल्लान् ? का हो हंसतां कां इतक्या ?

रुबी—मला—हा—हा—हा—( खूप हंसून ) असं वाटलं कीं तुह्मी कुणी—हा—हा—हा—( खूप हंसून ) कुणी तरी पुरुष आहांत !

कोकिळा—( स्वगत ) इश्श्‌ ! आजकाल जी बाई बघावी तिला आपला पुरुष पाहिजे ! कलियुग बरं हें, कलियुग ! आमच्या वेळीं नव्हतं बाई असं ! ( मुरका मारते )

रुबी—( पुन्हां हंसते ) पण बघतें तों तुह्मी आपल्या बायकोच !

कोकिळा—अहो, पण तुह्मांला तुमचा पुरुष पाह्यजे कशाला ?

रुबी—मावशी, तुह्मी फार भोळ्या दिसतां ! अहो, बायकांना त्यांचे पुरुष नकोत का ?

कोकिळा—कशाला पाह्यजेत हो ? अहो, माझं असं झालं ना ?

रुबी—( हंसू कोसळून ) असं झालं ? अहो, असं ह्मणजे कसं झालं मावशी ?

कोकिळा—अहो, कसं झालं ह्मणजे काय कपाळ सांगू ? अहो, माझं जेव्हां असं झालं ! तेव्हां मी सारी आठ वर्षांची होतें व तिकडनं लंगोटीच लावायचं होत होतं !

रुबी—( हंसू कोसळून ) तिकडनं ? आणि लंगोटी ? ( हंसतां हंसतां पुरे वाट होते )

कोकिळा—अहो, हंसतां काय ? ह्मणतात ना कीं परदुःख शीतळ असतं !

रुबी—( हंसूं आवरून ) नाहीं, नाहीं, मावशी—तुह्मी बोला. खरो-खर तुमची हकीकत ऐकून मला तुमच्या सम्बन्धानं फार ' सिम्पथी ' वाटतीय् !

कोकि०—शिम्पती ? शिम्पती ह्मणजे काय हो ? हा कोणत्या गांवचा पति? छेः गडे, तुह्मी कांहीं कांहीं चमत्कारिकच शब्द काढतां आहांत ! मघाशीं तुह्मीं आमटी काढलीत अन् आतां शिम्पती काढतां आहांत ! काय बाई चमत्कार तुमचा !

रुबी—शिम्पती राहूं द्या मावशी, आतां पुढें बोला !

कोकि०—अहो, पुढें काय बोलायचं आहे त्यांत ? तें कांहीं रामायण का आहे. कीं आपली रावणानं सीता चोरून नेलीन् आणि ती हणमन्तानं सोधून काढलीन् ! अहो, तुह्मीच विचार करा कीं तेंव्हांपासनं—

रुबी—( गम्भीरपणानें ) मावशी, हें तुमचं ह्मणणं बरोबर आहे ! पण मला कीं नाहीं आमच्या पुरुषाची गांठ पाह्यजे !

कोकि०—बरं बाई ! तुझंही ह्मणणं बरोबर आहे ! पण मी ह्मणतें कीं तुझे यजमान असे कसे चुकले आणि कुठें चुकले ?

रुबी—मावशी तें कीं नाहीं या गांवांत चुकलें—अगदीं या गांवांत !

कोकिळा—काय मेला चमत्कार ! इतके दिवस नुसतीं जनावरं चुकत होतीं, पण आतांशे नवरे देखील चुकायला लागले ! खरोखर, अलीकडच्या चुकारतट्टू नवऱ्यांकीरतां एखादा कोण्डवाडाच पाह्यजे. शाहुमहाराजांच्या हुकमानं असा जर कोण्डवाडा निघाला, तर मी सांगतें कीं वेळीं निदान निम्मे तरी नवरे ह्या कोण्डवाड्यांत कोण्डावे लागतील !

रुबी—पण मावशी, माझं एवढं काम कराल ना ?

कोकिळा—अग, तूं चिकटलीसच येऊन मला ! जसा कांहीं तुझा नवरा मी आपल्या घरींच ठेवलेला आहे. ( स्वगत ) आतां कसं करावं ? आमच्या शेजारीं अन्तुभट आहेत ना त्यांना विचारावा हिचा नवरा कुठें

गेला असेल हा प्रश्न ! ते पंचांग चांगलं जाणतात ! त्यांना विचारलं तर ते मात्र नेमकं सांगून देतील !

रुबी—मावशी, विचार कसला करतां आहां इतक्यांत ?

कोकि०—हें बघ तूं असं कर ! तूं उद्यां सकाळीं आमच्या घरीं ये ! आमच्या घराजवळ कीं नाहीं एक उत्कृष्ट ज्योतिषीबोवा आहेत, त्यांना तुझ्या यजमानाबद्दल प्रश्न विचारूं !

रुबी—फार उपकार होतील तुमचे मावशी !

कोकिळा—बरं मी जातें आतां ! अजून मला फोडणीला वरण टाकायचं आहे !

रुबी—अन् मलाही पावाला लोणी लावायचं आहे !

कोकिळा—( जातां जातां )

पाव पाव जगदम्बे
पाव तूं मला ( जाते )

रुबी—( जातां जातां )

धांव धांव पतिराय
भेट तूं मला—

पद १४ वें

( चाल—कशि गे सदा )

ओ माय डियर डू कम हियर लुकफॉर यू एव्हरी व्हेअर ॥ धृ० ॥ यू माय मनी । यस् यू माय हनी । आय् रोम्—नो होम्—ॲण्ड नो फियर ॥ १ ॥

[ O my dear, do come here
Look for you every where
You my money, yes you my honey,
I roam–no home–and no fear ]

( जाते )

## अंक पहिला

### प्रवेश पांचवा

[ छत्रसालची राजधानी. बाजीराव एकटाच एका बगीचांत प्रवेश करतो. त्याच्या एका हातांत मस्तानीची व एका हातांत काशीबाईची तसबीर आहे. ]

बाजीराव—( स्वतःशीं ) मी अगदीं वेडा होण्याच्या बेतांत आलेलों आहें ! ही माझी पुण्यांतील विवाहित प्रिय पत्नी आणि ही माझी प्रियतमा मस्तानी ! माझ्या प्रिय पत्नीकडे पाह्यलं म्हणजे मन पुण्यांत तन्मय होऊन जातं आणि मस्तानीकडे पाह्यलं म्हणजे मन बुन्देलखण्डांत तन्मय होतं ! पुणें प्रान्तांतून बुन्देलखण्डांत उड्डाण करणारं माझं मन—खरोखर हें योग्य वळणावर आहे का ? कीं हें भडकून गेलेलं आहे ? हें मन मी आवरूं कीं भरधांव सोडूं ? पण छेः ! मन आंवरण्याची आतां गोष्टच नको ! हें आतां भरधांव सुटलेलं आहे आणि मराठी घोडे ज्याप्रमाणें महाराष्ट्राच्या बाहेर पडून हिन्दुपदपादशाहीची मर्यादा वाढवीत आहेत, याप्रमाणं हें माझं मन मराठी मुलखाच्या बाहेर पडून माझ्या प्रेमसाम्राज्याची मर्यादा वाढवीत आहे ! अफाट हिन्दी साम्राज्यावर सत्ता चालविणाऱ्या सर्ववन्द्य श्रीशाहुछत्रपतींचा हा इमानदार सेवक जर प्रेमसाम्राज्यावर अफाट सत्ता चालवायला लागला तर ह्यांत माझी चूक झाली असं कोण ह्मणेल ? ( पडद्याकडे पाहून ) अरे, पण ही माझी मनमोहिनी इथेंच बसली आहे ! ही काय करते आहे हें पाहूं ! ( जातो )

( नन्तर पदमकुंवारी हार गुन्फीत प्रवेश करते )

पदम०—( स्वगत ) नाहीं ! चैन पडत नाहीं ! पुष्कळ विवेक केला तरी चैन पडत नाहीं ! अजून माझं मन वीरशिरोमणि बाजीरावाचे भोंवतीं रुंजी घालीत आहे ! बाजीराव आतां माझा नाहीं, मस्तानीचा आहे ! ( बोटें मोडून ) माझी सवत मस्तानी हिनं माझा बाजीराव माझ्यापासनं हिरावून नेलेला आहे ! ( पश्चात्तापानें ) छेः, छेः, छेः, छेः ! पण मत्सराच्या भरांत माझ्या बहिणीविषयीं हें मी काय बोलतें आहे ! माझ्या प्रेमाचा धिःकार झाला ह्मणून मी आपल्या बहिणीला असं बोलावं हें

चांगलं नव्हे ! पण मी आतां काय करूं ? या विरहवेदना मी कशा सहन करूं ? मला ही दुनिया शून्य झालेली आहे ! उजेड देखील मला अन्धकाराप्रमाणं भासतो आहे !

पद १५ वें

( चाल—जावो जावो राजा मोरे जावो )

या प्रेमी जिवाची निराशा ही । जिवलगा दया नच त्या कांहीं ॥ धृ० ॥ धांव सख्या मज भेट किरे । जीव हलक झाला । दुःखाग्नी हा पेटला । जाळीना ही अबला । घेसि हातीं सुरा । चिरिनासी पुरा । काय तूझी तऱ्हा । जीव हा ! अजोनि न हा जाई ॥ १ ॥

माझ्या आयुष्याचा अन्त कसा होत नाहीं ? ही धरित्री दुभंग कां होत नाहीं ? माझे अंगावर वीज कां कोसळत नाहीं ? बाई चपले, भलत्या ठिकाणीं पडून गरीबांची घरं धुळीला मिळविण्यापेक्षां प्रियकराच्या प्रेमाला आंचवलेल्या या पद्मकुंवारीच्या देहावर तूं कोसळलीस तर एका कुमारिकेला असह्य वेदनांतनं सोडिवल्याचं पुण्य तरी तुला लागेल ! ( हंसून ) अग बाई, पण हीं पावलं कुणाचीं वाजताहेत ? माझ्या प्रियकराचींच का ? माझा धिःकार केल्याबद्दल त्याला पश्चात्ताप का वाटला ? माझी त्याला कींव का आली ? ( पुन्हां ऐकलेंसें करून ) चोराचीं पावलं चोराला ओळखतात असं ह्मणतात, मग माझं हृदय चोरणाऱ्या बाजीरावाचीं पावलं मला कां ओळखूं नयेत ? ( हंसून ) अग बाई ! ते अगदीं हलु पावलांनीं येत आहेत ! तर आपणही हा हार गुम्फण्यांत अगदीं निमग्न झाल्यासारखं दाखवावं ! ( खालीं मान घालून हार गुम्फूं लागते )

[ बाजीराव प्रवेश करतो. ]

बाजी०—( हंसून ) ( स्वगत ) अरे वाः ही हार गुम्फतीय् वाटतं ! काय हे विनाकारण श्रम ! तरुणींच्या बाहूंचा विळखा गळ्याभोंवतीं पडला ह्मणजे जो आनंद वाटत असतो, त्यापेक्षां हा हार गळ्यांत घालून ज्यास्त सुख वाटतं असं ह्या तरुणींना वाटतं कीं काय ? काय हा वेडेपणा ! पण ह्यांत त्यांचा कांहीं एक दोष नाहीं ! सुवर्णाला आपल्या सुवर्णपणाची

जाणीव नसायचीच आणि आपण किती सुवासिक आहों हें कस्तुरीला ठाऊक नसायचंच !

पदम०—( स्वगत ) फुलांनो, जलदी करा. वीराच्या गळ्यांत पडायचं भाग्य फार क्वचित् सांपडतं बरं !

बाजी०—( दुरून पाहून ) ( स्वगत ) बा जी रा व ! काय ? माझं नांवही हारांत गुम्फतीय् वाटतं ! ( पुढें होऊन ) लाडके कशाला हे श्रम, या हारांत बाजीरावाचा कण्ठ सांपडण्यापेक्षां ह्या बाजीरावाचे कण्ठांत तुझ्या बाहूंचा हारच पडूं दे ह्मणजे झालं !

पदम०—पण असं कशाला ? ह्या हारासकट माझे बाहू—( हार घालण्यासाठीं पुढें होते. )

बाजी०— ( ओळखून ) कोण ? पदमकुंवारी ? राजकन्या पदम-कुंवारी ?

पदम०—होय, तीच आपली दासी !

बाजी०—ताईसाहेब, आपण का ? अरेरे ! माझी मस्तानी तिकडे-माझ्यासाठीं झुरत बसली असेल !

( घाईनें निघून जातो )

पदम०—(स्वगत) हे गेले ! मला टाकून गेले ! हे आले तेव्हां कोणत्या गोड कल्पनेंत मी होतें ! मला वाटलं होतं कीं माझा धिःकार केल्याचा त्यांना पश्चात्ताप झाला आणि माझा: स्वीकार करायला ते आले ! पण—( डोळ्यांत पाणी आणून ) माझ्यासाठीं ते आलेले नव्हते ! ते मस्तानी-साठीं आलेले होते !

पद १६ वें

( चाल-पादशाह है सहारा )

पहा कसा खेळ खेळे । दैव पाहुनी मला । भीरुकोमला ॥ ध्रु० ॥
येइ, भेट देई, वाटे । परि दूरचि लोटे । नाथ अन्ति देव झाला ॥ १ ॥

( हाराकडे पाहून ) हे हारा, प्रियकराच्या:कण्ठांत पडायला न सांपड-ल्यामुळें तूं किती सुकून गेला आहेस ! माझ्या हृदयाप्रमाणंच तूं कोमेज-लेला आहेस ! माझ्या प्रेमाप्रमाणंच वाळून गेलेला आहेस ! आतां तुझं न् माझं सार्थक मी कशी करूं ? मी आतां विष पिऊन मरून जाणार आणि

तुला प्रियकराच्या तसबिरीवर घालून माझ्यापेक्षां श्रेष्ठ मरण देणार ! प्रियकराच्या तसबिरीवर तूं सुकून जाशील त्यावेळीं ह्या पदमकुवारीची आठवण कर आणि तुझी फुलं मी गुम्फलेलीं होतीं हें ध्यानांत ठेव ! पण—पण हा बगीचा ! इथें माझ्या प्रियकराची तसबीर कुठली आणि इथं विष तरी कुठलं ? हलाहल विषा, अशा वेळीं एका अबलेच्या उपयोगी पडशील, तर तुला पुण्य तरी लागेल ! अगबाई ! (हंसून) हा कोण ? हा भयंकर साप ( त्याच्याकडे पाहून ) कृष्णसर्पा, ये, ये, आणि मला कडकडून भेट ! ह्या जगांत प्रियकराच्या बाहूंचा विळखा पडून शरीर धुन्द तरी होऊन जावं किंवा शरीराला कृष्णसर्पाचा विळखा पडून शरीर अचेतन तरी होऊन पडावं ! कृष्णसर्पा, ये ये ! आणि ही गोड बेशुद्धि मला दे ! काय ? तूं येत नाहींस ? बरं आहे ! नको येऊंस ! दुर्दैवी माणसांचे मित्रसुद्धां पळून जातात ! मग त्याच्यापासनं शत्रु पळाले तर त्यांत काय नवल ? पण तुझ्या अशा फुसकारण्याला दाद देणारी ही पदमकुंवारी नव्हे ! तुझ्या फुत्कारांतनं तुझं विष मी ह्या पानांत काढून घेईन आणि तें पिऊन अमर होऊन जाईन ! ( तसें करते ) ( आनन्दानें ) वाः ! हें विष पुष्कळ झालं ! आतां ह्या करदळीच्या पानांवर रुईच्या चिकानं प्रियकराची तसबीर काढावी आणि तिला हा हार अर्पण करून हें विष प्राशन करावं !

[ तसबीर काढण्यांत निमग्न होते. सर्प तिचेवर फणा पसरून डुलत राहातो. ]

**मस्तानी**—( प्रवेश करून ) काय ? ही माझी ताई ? सर्पानं देखील हिच्यावर छत्र धरलेलं आहे ? छत्रसाल राजाला हीच मुलगी शोभते ! मी शोभत नाहीं ! खरोखर हें तिचं निःस्वार्थी प्रेम पाहून मी अगदीं थक होऊन गेलें आहें ! हिच्या निःस्वार्थीपणानंच ह्या सर्पानं आपली फणा हिच्यावर धरलेली आहे !

पद १७ वें

( चाल—काहेको पिया जावेरी )

**भुजंग इजवरती करि सावली ॥ धृ० ॥ हृदयीं रंगत । गुंगत नाथगुणीं । चिन्तानिं लयाहि पावली ॥ १ ॥**

अग बाई ! काय हुबेहुब तसबीर काढते आहे ही ! तिकडनं जर ही

तसबीर बघायची झाली तर पुण्याचा दरबारांतनं साऱ्या चित्रकारांना काढू-नच लावणं होईल ! अगबाई, हिची तसबीर सम्पत आली ! ही तसबीर सम्पायच्या अगोदर हा विषाचा द्रोण इथनं हालवला पाह्यजे, आणि ह्याचे जागीं जिवनरस इथें ठेवला पाह्यजे.

[ तसें करते व निघून जाते. ]

पद्म०—( हंसून ) ही तसबीर तर पुरी झाली ! आतां बाजीराया, हा हार घे आणि जरी तूं माझ्यावर प्रत्यक्ष प्रसन्न झाला नाहींस तरी चित्ररूपानं तरी माझ्यावर प्रसन्न हो ! ( चित्राकडे पाहून ) काय ? झाल्रास ना प्रसन्न ? आतां ह्या आनन्दाच्या भरांत मी हें विष घेतें आणि तुझ्या चर-णापाशीं मरून जातें. ( विष समजून जीवनरसच पिते ) अहाहा ! किती आनन्ददायक आहे हें विष ! हें विष कुणाचाही प्राण घेत असेल असं मला कांहीं वाटत नाहीं !

[ मस्तानी प्रवेश करते. ]

मस्तानी—ताई, खरंच तसं आहे. हें विष कुणाचाही प्राण घेणार नाहीं.

पद्म०—कां बरं ?

मस्तानी—कारण तें विष आतां विष राह्यलेलं नाहीं ! तें अमृत झालेलं आहे ! ( स्वगत ) हिला खरी हकीकत मुळींच सांगतां उपयोगी नाहीं ! कारण ही इतकी थोर आहे कीं खरोखर हिला पाहून विषाचं अमृतच बनेल !

पद्म०—काय ह्मणतेस ? तें विष राह्यलेलं नाहीं ? हें असं कसं झालं ?

मस्तानी—तुझ्या अपरिमित पवित्रपणामुळं असं झालं ! पवित्र माण-सांची पवित्र मनं तरवारीच्या तीक्ष्ण धारेला देखील रेशीम बनवतील, मग तीं विषाचं अमृत बनवतील ह्यांत काय नवल आहे ?

पद्म०—काय ह्मणतेस? विष देखील मला पाहून पळून गेलं ?

मस्तानी—ताई, तें तुला शरण आलं ! अग, तुला माहीत नाहीं ! पण सर्पानंही तुझ्या मस्तकावर छत्र धरलेलं मी प्रत्यक्ष पाह्यल ! ह्मणून ह्मणतें कीं तूं विषाची परीक्षा सोडून दे ! तुझ्यासारखीं सद्गुणी आणि स्वार्थ-त्यागी माणसं जगलीं पाह्यजेत आणि आह्मांसारख्या संसारी जिवांच्या संसा-रावर आशीर्वाद देऊन त्यांनीं सर्व जगाला ललामभूत झालं पाह्यजे !

पद्म०—( हंसून ) मस्तानी, माझा तुझ्यावर पूर्ण आशीर्वाद आहे !

मस्तानी—( लाजत ) नुसता माझ्यावर नको !

पद्म०—( हंसत ) मग आणखी कुणावर ?

मस्तानी—( लाजत ) तें मला नाहीं समजत, पण नुसता माझ्यावर नको !

पद्म०—( हंसत ) बरं आहे, तुह्मां दोघांवर !

मस्ता०—( लाजत ) ताई, नांव घेऊन बोल !

पद्म०—( हंसत ) मस्तानी, नांव घ्यायचा माझा अधिकार सम्पला ! आतां तूंच नांव घे !

मस्तानी—( लाजत ) इश्श् !

पद्म०—( हंसून ) घे, घे, नांव ! हूं, घे नांव !

मस्तानी—( लाजत )

सोन्याचा करा मोत्यांनीं भरा—

( लाजते )

पद्म०—छेः बाई, हें काय लाजणं ! ह्या लाजण्यानं तूं पुण्यांतल्या लाजाळू मुलींवर ताण केलेली आहेस ! हूं घे नांव ! धर तो सोन्याचा करा मोत्यांनीं !

मस्तानी—( नांव घेते )

पद १८ वें

( चाल—बासरी बासरी शामाकि )

लाडकी लाडकी । स्वारीची लाडकी ॥ धृ० ॥ हिन्दुजनीं जे ठरले गाजी । दुनिया सारी ज्यावरि राजी । जीव भुले । हृदय खुले । तें नांव गोड कीं ॥ १ ॥

पद्म०—अग तें सर्व झालं, पण शेवटीं तें नांव राह्यलंच !

सोनियाचा करा । मोत्यांनिं हो भरा ॥ धृ० ॥ सासूबाईच्या आलें पोटीं । ज्यास्तव केलें नवसां कोटि । बाजीराव सौख्यझरा । शूरांतला हिरा ॥ १ ॥

( पडदा पडतो. )

अंक पहिला समाप्त

# अंक दुसरा

## प्रवेश १ ला

[ धावडशी येथील एका बाजूच्या रस्त्यावर दौलतराव प्रवेश करतो. त्यास मांजर आडवें जातें. ]

दौल०—अरे शुक्, अरे शुक ! ( प्रेक्षकांकडे पाहून ) काय करावं ? मांजर आडवं गेलं ! मी एवढ्या मोहिमेवर निघालों न् मांजर आडवं गेलं ! आतां माझीं सारीं कामं बिघडणार ! ( वाईट तोण्ड करून उभा राहातो. )

[ रोशन बिब्बी प्रवेश करते. ]

रोशन०—अफसोस ! अफसोस ! मेरा खाविन्द चला गया ! मेरा खाविन्द चला गया !

दौल०—( आनन्दी चेहरा करून ) अरेच्या ! मी माझीं सारीं कामं बिघडणार ह्मणून ह्मटलं, पण इथें माझं काम साधणार असं दिसतंय् ! मांजर आडवं जाणं ह्मणजे एकूण कांहीं अगदीं वाईट नाहीं तर !

रोशन०—( सचिन्त चेहरा करून ) वो कहां गया होगा ? मेरा खाविन्द कहां गया होगा ? मैंने बहोत सोच किया मगर मुझे वो मिलता नहीं ! उस दिन एक आद्मी मुझे दिखा और मैं समझी कि वही मेरा खाविन्द है ! मगर वो मेरी भूल थी ! ( आतुरतेनें ) मेरे खाविन्द, मेरे खाविन्द—

पद १९ वें

देखुं कहां वो मेरा। बोलो जी दिल्का प्यारा। वबर गई मैं, आन्धेरा सारा। क्यंकर आकर ठैरा ॥ धृ० ॥ निसदिन तुझपर नैना। बन बन फिरती ये मैना। आती है याद मोरा। गाती हूं गाना तेरा ॥ १ ॥

दौलत—( स्वगत ) ही वेळ पुढें व्हायला चांगली आहे ! ( खांकरून लाम्बूनच ) ह्मटलं मी इथें उभा आहें !

रोश०—मेरे खाविन्द ! मेरी दौलत !—

दौल—( आनन्दानें ) ( स्वगत ) काय ? दौलत ? अरेच्या ! ही माझंच नांव घेते आहे ! बस्स् ! आज माझ्या जन्माचं सार्थक झालं ! माझ्या आईबापांनो, खरोखर, आज तुह्मी स्वर्गाला गेलांत ! अब् वहीं ठैरो ! ( शेवटचे शब्द मोठ्यानें येतात. )

रोशन—( कानोसा घेत ) ( स्वगत ) ' अब् वहीं ठैरो ' ? ये आवाज कहांसे आती है ? मेरा खाविन्द तो मुझे नहीं पुकारता ? ( डोळ्यांत पाणी आणून ) मेरी दौलत ! मेरी दौलत !

दौलत—( लाम्बूनच खांकरून ) ह्मटलं मी इथें उभा आहे !

रोश०—( त्याच्याकडे पाहून ) मेरी दौलत ! जल्द करो, और मेरे पास आ जाव !

दौल०—( लाम्बून खांकरून ) हा आलोंच ! जलदी ( जलदीनें तिच्या जवळ जातो व गुडघे टेंकून बसतो. प्रथम तिच्या लक्ष्यांत येत नाहीं ! )

रोश०—मेरी दौलत !

दौल०—( गुडघे टेंकलेले असतांनाच ) ह्मटलं मी इथेंच आहें !

रोश०—( घाबरून ) एं ये कौन बेवकूफ ? ( त्याला लाथ मारते. )

दौल०—[ प्रेक्षकांच्याकडे पाहून ] अरेरे ! कुणीं पाह्यलं नाहीं ना ? एका तरुण स्त्रीशीं लघळपणा केल्यामुळें तिनं मला लाथा मारल्या हें कुणीं पाह्यलं नाहीं ना ? बाकी, ( डोळे मिचकावून ) मीं कांहीं असा एकटाच नसेन ह्मणा ! किती तरी लोक तरुण स्त्रियांशीं लघळपणा करायला जात असतील आणि अशाच लाथा खात असतील ! फरक एवढाच कीं कुणी गुप्तपणें लाथा खातात आणे कुणी माझ्यासारख्या उघड लाथा खातात ! बाकी ही लाथ जरा जोरानं लागली बोवा ! ह्या एकाच लाथेनं माझा मगज कसा अगदीं बिलबिलीत होऊन गेलेला आहे !

रोश०—बिल्ली ! बिल्ली ! बिल्लीका क्या चला है ?

दौल०—( डोकें चोळीत निलाजरेपणानें पुढें जाऊन ) ऐसा हुवा कि मेरी एक बिल्ली थी !



मस्तानीः–भुजंग इजवरती करि सावली ॥ (पान २८.)

रोश०—( त्रासीकपणानें ) सच् ?

दौल०—तुमारी कसम ! मेरी बिल्ली अभी बहोत लोगोंने देखी है !

रोश०—फिर क्या हुवा ?

दौल०—वो अब् मिलती नहीं ? इतनेमें मैंने तुमको देखा ! तो मैं क्या समझा ? कि यही मेरी बिल्ली !

रोश०—बेवकूफ ! बेशरम ! मुझको बिल्ली कहता है ? (थप्पड मारते)

दौल०—( स्वगत ) अरेच्या मी आपलं खरं सांगायला गेलों तरी तिकडनंही थप्पड बसली ! आजकाल खऱ्याची दुनियाच नाहीं ! आजकाल जो खरं बोलेल त्याला दोहींकडनं थप्पड बसेल !

रोश०—क्यं बेमान ! ह्यासे निकलता है कि नहीं ?

दौल०—( निलाजरेपणानें ) मैं अपनी बिल्लीको देखूं गा ! ( तिच्याकडे नजर लावतो. )

रोश०—फिर मस्करी करता है ? फिर मस्करी करता हैं ? ( त्याचा कान पकडते. )

दौल०—छेः, ही कानाची कळ नाहीं बोवा सोसवत ! खरोखर परस्त्रियांच्या नादीं लागलेल्या माझ्यासारख्या लोकांची रोज अशीच कान उघाडणी होत असेल आणि तेही बहाद्दर अशीच कळ सोसून निलाजरेपणानं बसत असतील !

रोश०—जाता है कि नहीं यहांसे ? ( जोरानें कान पिळते. )

दौल०—( स्वगत ) छेः ! माझ्या डोळ्यांत पाणी यायची वेळ आली ! अयाई ! अयाई ! तरी मला वाटलंच कीं मांजर आडवं गेलंय् ! तेव्हां दिवस कांहीं बरा जाणार नाहीं ! अन शेवटीं मांजराच्याच पायीं माझे हाल झाले ! अयाई ! अयाई ! ( ती जोरानें कान पिळते. )

[ ॲण्टोनियो प्रवेश करतो. ]

ॲण्टो०—( स्वगत ) अरेच्या ! हें काय चाललंय् इथें ?

रोश०---( स्वगत ) वो आया उस दिनका आझी ! अब् यहां ठैरना अच्छा नहीं ! ( जातं )

ॲण्टो---काय हो दौलतराव, काय चाललं होतं इथें ?

दौल०---( अवसान आणून ) बरं झालं बोवा कीं हें तुमच्याशिवाय कुणी पाह्यलं नाहीं ! अहो, नाहींतर चारचौघांत माझी केवढी नाचक्की झाली असती !

ॲण्टो०---अहो, पण झालं काय खरं ?

दौल०---अहो, खरं काय व्हायचंय् ? ती बाई इथें आली आणि तिनं एकदम माझा कान पकडलान् !

ॲण्टो०---एकदम ? तिनं तुमचा कान एकदम पकडलान् ? ( हंसून) अशक्य ! अगदीं अशक्य !

दौल०---वाः ! अजून माझा कान दुखतोय् आणि तुह्मी ह्मणतां अशक्य ! ह्मणतात ना कीं ' परदुःख शीतळ आहे ' ! तिनं तुमचा कान धरला असता म्हणजे समजलं असतं सुख !

ॲण्टो०---ऊंः ! त्यांत काय समजायचं आहे ? असली गोष्ट मीं कानामागंच टाकली असती !

दौल०---अहो, मी सुद्धां ही गोष्ट कानामागंच टाकणार होतों. पण तिनं मागून येऊन माझा कान धरला ! अगदीं विनाकारण धरलान् हो माझा कान !

ॲण्टो०---( हंसून ) बाकी मी सांगतों कीं बायका विनाकारण कुणाच्याही कान धरणार नाहींत ! बायकांचा कुणीतरी हात धरायला गेल्याशिवाय त्या कधींही कुणाच्या कानाला हात लावणार नाहींत ! तुह्मीही असेच कांहीं गुण पाघळायला गेलां असाल !

दौल०---अहो, जाऊं द्या आतां त्या मागच्या गोष्टी ! हें पहा मनुष्यानं जुन्या गोष्टी कधीं काढूं नयेत ! बाकी एवढं करा अं ! कीं इथें एका बाईनं माझा कान धरला ही गोष्ट मात्र अगदीं ह्या कानाची त्या कानाला कळूं देऊं नका !

ॲण्टो०--छेः हो, माझ्याकडनं ही गोष्ट षट्कर्णी होईल अशी शंका-देखलि घेऊं नका! अहो! घरोघरीं मातीच्या चुली! ह्या जगांत असा कोण आहे कीं परक्या बायकोनं ज्याचा कान धरला नाहीं?

दौल०—तुह्मी ह्मणतां तें अगदीं खरं आहे! अहो, पहिल्यान्दा मी देखील परक्या बायकोकडे कधीं पहात नव्हतों, पण ती बाई जेव्हां 'दौलत' 'दौलत' असं ह्मणायला लागली तेव्हां मात्र कानांत वारं भरल्यासारखं झालं! बाकी मला मघांशींच वाटलं कीं आजचा दिवस अगदीं वाईट जाणार!

ॲण्टो०—तें कशावरनं बोवा?

दौल०--अहो, मी आज सकाळींच एका मोठ्या मोहिमेवर निघायचा विचार केला, पण सकाळपासनं अगदीं वाईट शकून झाले! एकदां पत्रिका तर पहा माझी!

ॲण्टो०—पत्रिका पाहीन किंवा नुसता प्रश्नच माण्डून सांगेन—अहो, आपल्याकडे ज्योतिषाच्या दोन्ही बाजू आहेत! पण अपशकुन काय काय झालं ते तरी सांगा प्रथम!

दौल०—अहो, काय काय झाले ह्मणून काय विचारतां? सकाळीं उठलों तों पाल कुचकुचली! पुढें बातमी आली कीं दूध देतांना गाईनं लाथ मारलीन्! तरी पण तसाच मुठींत जीव धरून मोहिमेवर निघालों, तो तितक्यांत मांजर आडवं गेलं!

ॲण्टो०---मांजर आडवं गेलं अं! मोठाच अपशकुन झाला तुह्मांला! याबद्दल चांगलीच शान्ति केली पाहिजे.

दौल०--हो, खरंच! ह्याबद्दल शान्ति काय करावी हो?

ॲण्टो०--अहो, मांजर आडवं गेलं ह्मणजे सोन्याचे उंदिर करून ब्राह्मणाला द्यावे!

दौल०—काय? सोन्याचे उन्दिर? छेः, फार खर्चाचं काम बोवा हें! बरं पण असं नाहीं केलं तर?

ॲण्टो०—तर काय ? मनुष्य सातजन्म मांजर होतो !

दौल०—सातजन्म मांजर ? अरे बाप ! आत्तांच माझीं बुभळं मला घिंवळीं झाल्यासारखीं दिसायला लागलीं आहेत ! जोशीबोवा, ह्यापेक्षां कांहीं सोपं प्रायश्चित्त सांगा बोवा ! एखादा साधाच उन्दिर ब्राह्मणाला दिला तर नाहीं का हो चालायचं ?

ॲण्टो०—सांगेन् मग पोथी पाहून ! पण तुम्ही अशा मोहिमेवर तरी कोणत्या निघालां सांगा पाहूं !

दौल०—अहो, बायको मिळविण्याच्या ! बाजीरावानं मस्तानी मिळविलीन् आम्ही काय बांगड्या भरलेल्या आहेत ? अन्तुभट, मीही कुठनं तरी एक फटाकडी बायको घेऊन येतों कीं नाहीं पहा !

ॲण्टो०—अहो, पण लग्नाची का पाटाची ?

दौल०—अहो, जी जमेल ती ! लग्नाची जमली तर लग्नाची, पाटाची जमली तर पाटाची !

ॲण्टो०—मी सांगतों तुम्हांला ! लग्नाच्या अन्तरपाटापेक्षां नुसता पाटच चांगला !

दौल०—तो कसा काय ?

ॲण्टो०—अहो, अन्तरपाट म्हटला कीं शहाण्णव कुळींची वाटाघाट ! पण पाटाला तें कांहीं नाहीं ! मंत्रांना काट—मुहूर्ताला छाट—पाहुण्यांना नाट ! एक तेवढं पैक्याचं ताट भरलेलं असलं कीं मनुष्याची लाट झालीच !

पद २० वें

( चाल—कपोला कपोलाचि )

घ्या, पाट लावा, करा, बायको । घोडा कि वाजंत्रि त्याला नको ॥ धृ० ॥ पाहूं नका मास किंवा मिती । कीं बाळगा अन्य कांहीं क्षिती । राहो मनीं प्रीति किंवा सुको । पाटामुळें प्रेमखेती पिको ॥ १ ॥

दौल०—वाः दोस्त ! तुमची ही सल्ला फार बहारीची आहे बोवा ! बरं पण मला एवढं सांगा कीं कोणत्या दिशेनं गेलं म्हणजे माझी ही मोहीम यशस्वी होईल ?

ॲण्टो०—हिंमतवान् माणसांना दाही दिशा मोकळ्या आहेत!

दौल०—नाहीं, तुमच्या ज्योतिषशास्त्राप्रमाणं सांगा!

ॲण्टो०—अहो, हें ज्योतिषशास्त्र म्हणजे भित्र्या भागूबाईचं शास्त्र आहे! ज्याला भीतीचा लवलेश नाहीं, त्याच्यापुढें प्रत्यक्ष मंगळ उभा केला तरी तो कांहींएक टंगळमंगळ करीत नाहीं!

दौल०—मग काय? मी वाटेल त्या दिशेला जाऊं म्हणतां?

ॲण्टो०—हो, हो, वाटेल त्या दिशेला जा!

दौल०—नाहींतर मग पाठीमागनं तुम्हीच म्हणाल कीं माझी दिशा चुकली!

ॲण्टो०—अहो, तुम्ही कोणत्याही दिशेला गेलां तरी दिशाभूल होऊं देऊं नका म्हणजे झालं!

दौल०—अहो, आतां मी करीन ती पूर्व दिशा! तेव्हां दिशाभूल व्हायची आतां भीतीच नाहीं!

ॲण्टो०—तरी पण एवढं करा—तुमचं नांव—'दौलतराव' नाहीं का? रेवती नक्षत्र—देवता सूर्य—कामदायक—पर्यंकाकार—गजगति—अन्धलोचन!—हं तुम्ही उत्तरेकडची वाट धरा म्हणजे तुमचं काम फत्ते होईल!

दौल०—उत्तरेकडची? अगदीं डोळे मिटून उत्तरेकडची वाट धरूं?

ॲण्टो०—नाहीं, नाहीं, डोळे तेवढे उघडे ठेवा!

दौल०—हं, ठीक आहे! मी आतां घरीं जातच नाहीं! ही धरली उत्तरेकडची वाट! तुम्हीही दक्षिणेकडनं जा!

ॲण्टो०—हो, मला तिकडेच स्नानाला जायचं आहे.

दौल०—अहो, तुम्ही दक्षिणेकडनं गेला म्हणजे तुम्हांला आणखी निराळी दक्षिणा द्यायला नको!

ॲण्टो०—अहो, तुमचं काम फत्ते झालं म्हणजे तुम्ही आपोआप मला दक्षिणा द्याल! मी दक्षिणा कधीं उधार मागतच नाहीं. (जातो)

दौल०—मला उत्तरेकडे जायला सांगितलय् नाहीं का ह्यांनीं ? हां ठीक ! धरा आतां हीच वाट ! बाजीरावाचं नशीब जसें उत्तरेकडे गेल्यामुळं उघडलं, तसं माझंही तिकडेच उघडणार असं दिसतंय् ! आतां मात्र मला चांगले शकुन होवोत ! निदान ह्या वेळीं पुन्हां एखादं मांजर मला आडवं न जावो ! ( पडद्याकडे ) अं ? हें कोण ? वाः ! काय पण चांगला शकून हा ! ( टक लावून उभा राहातो. )

( मावशी प्रवेश करते )

मावशी—इश्श् ! हें कोण रस्त्यांत उभं ? अन् बायकांच्याकडे अशी टक कोण लावतंय् ?

दौल०—( स्वगत ) टक लावायला अगदीं सौन्दर्य साण्डतंच कीं नाहीं ?

मावशी—अहो, आमचं हें असं झालं म्हणून—

दौल०—( स्वगत ) अहो, तुमचं कसचं असं झालं ? माझं मात्र सकाळपासनं हें असं होतंय् ! बाहेर कुठं निघायची सोय नाहीं ! बाहेर निघालं कीं हे असे शकून !

मावशी—( नखऱ्यानें ) अहो, जरा वाटेतनं दूर व्हा, बरं का ? हें माझं गवाळं न् सम्बळी—

दौल०—मावशी, तुमचं गवाळं राहूं द्या असंच ! त्याची कांहीं काळजी करूं नका ! मीच आपला आतां गाशा गुंडाळतों !

मावशी—नाहीं, म्हटलं ह्या सम्बळींत माझे देव आहेत ! एक टाक आहे, एक लंगडा बाळकृष्ण आहे, एक उजव्या सोण्डेचा गणपति आहे--

दौल०—मावशी, मीच आपला मोर्चा आतां डावीकडे वळवतों ! पण निघायच्या पूर्वीं आपल्याजवळ एक मागणं आहे. मागूं का ?

मावशी—अहो, मी अशी झालेली—

दौल०—( रडवें तोण्ड करून ) अहो, पण मावशी, माझंही सकाळपासनं हें असंच झालंय् ना ?

मावशी—( हसून ) काय तुमचंही असंच झालंय् ? इश्श् ! पुरुषांचं कधीं नव्हतं बाई असं झालेलं ऐकलं !

दौल०—( रडत ) मावशी, काय सांगू तुह्मांला ? पण सकाळपासनं अगदीं हें अस्सं झालंय् ! तेव्हां तुमच्यापाशीं एवढंच मागणं मागायचंय कीं आतां ह्यापुढें तरी मला चांगले शकून होऊं द्या !

( तिच्यापुढें साष्टांग नमस्कार घालतो. )

मावशी—उठा, उठा बरं, तुह्माला चांगले शकून होतील अन् तुह्मांला शतौक्ष होईल.

दौल०—मावशी, मला शतायुष्य नको आहे. अहो, आजचा दिवस जरी माझा चांगल्या शकुनांत गेला तरी पुरे आहे ! मावशी सकाळपासनं हें असं झाल्यामुळं माझा जीव अगदीं उडून गेलेला आहे !

मावशी—उठा, उठा, हें असं काय करतां ? कुणी पाह्यलं तर तुम्हाला न् मला दोघांनाही हंसतील ! त्यांतनं तो अन्तुभट—

दौल०—( चटदिशीं उठून ) अन्तुभट ना ? ते आत्तां इकडे गेले.

मावशी—मग जाऊं दे बाई मला ! गेले पंधरा दिवस स्वारीनं कुठें गुंगारा दिला होता कुणाला ठाऊक ! ती बाई तर माझ्या अगदीं पाठीस लागलीयू !

दौल०—( हंसून ) काय म्हणतां मावशी ? एक बाई तुमच्या पाठीस लागलीयू ?

मावशी—होय हो !

दौल०—( स्वगत ) हाय हाय ! जगांतल्या बायकांना वेड लागलं कीं काय ! ह्या मावशीबाईंच्या देखील पाठीस एक बायको लागलीयू म्हणे ! मग माझ्याच पाठीस कुणी बाई कशी लागत नाहीं हो ? ( जातो )

मावशी—( हंसून ) वेडा आहे कुणीतरी ! अलीकडे बघतें तों बायकांना न् पुरुषांना एकमेकाचं वेड लागायला लागलं आहे ! ती बाई तिकडे तशी न् हा माणूस इकडे असा ! कलियुग बरं हें कलियुग ! आमच्या वेळीं नव्हतं बाई असं ! ( झणक्यानें पडद्यांत जाते. )

—०—

## अंक दुसरा

### प्रवेश दुसरा

[ नगराचे बाहेर छत्रसाल एकटेच प्रवेश करतात. ]

छत्र०—खरोखर, मुलींचे बाप म्हणजे अगदीं वेडे ! मुलींच्या बापां-सारखे वेडे दुसरे कोणी नाहींत ! मुलींच्या बापांना असं वाटत असतं कीं दुसऱ्यांच्या मुली वाईट असतील पण आपली मुलगी म्हणजे रुक्मिणी किंवा सावित्री ! तिची दृष्टि अगदीं सरळ आणि वर्तन अगदीं धुतल्या तान्दुळासारखं ! मुलींच्या बापांना एवढं कळत नाहीं कीं, आपल्याही मुलींना तारुण्य आहे आणि वेळ आली म्हणजे तें तारुण्य दंगा करणारच ! अहो, रुक्मिणीनं देखील जर कृष्णाला चोरून चिठ्ठया पाठविल्या आणि सावित्रीनं देखील जर पति शोधण्याकरितां देशोदेशीं संचार केला तर आपली ही मुलगी मदन संचारल्याशिवाय कशी राहील ? अहो, हा मदन एकदां संचरला कीं डोळे कितीही सरळ असले तरी ते वांकडे होतात. सरळ भांग वांकडा व्हायला लागतो, सरळ पाऊल वांकडं पडतं, आणि बापाशीं वांकडं येऊन मुलगी सरळ आपल्या प्रियकराचा रस्ता सुधारते.

पद २१ वें

प्रेमाचि शाला विशाला । प्रणयनकुशाला । जाइ यदा नव बाला । नव नव रूप लाभे तिला ।। धृ० ।। तरुणी प्रेमें होतांचि वेडी । पाहे वांकडी । वेणी तिपेडी । गोल बांक गाला ।। १ ।।

( पडद्याकडे पाहून ) अरे वाः ! ही मस्तानी आलीच ! बरं झालं कीं आपला बाप आपले पाळतीवर आहे हें तिला माहीत नाहीं ! नाहींतर बाजीरावाबरोबर जाण्यांतला तिचा सगळा आनन्द नाहींसा झाला असता. काय ही मुलींची जात भित्री ! ह्या मस्तानीला कल्पना तरी आहे का कीं मी कांहीं इतर मुलींच्या बापांसारखा वेडा नाहीं ! आणि बाजीरावासारख्या प्रियकराबरोबर जायला माझं अगदीं पूर्ण अनु-

मोदन आहे ! चला आपण जरा एके बाजूला होऊं आणि बाजीराव–मस्तानीचें हें प्रेमकौतुक उसळल्या आनन्दानं पाहूं !

[ पदमकुंवार प्रवेश करते. ]

कायही पदमकुंवार ? मस्तानीप्रमाणं हिनंही माझ्या हातावर तुरी द्यायचा बेत केलेला आहे कीं काय ? वाः ! मला वाटलं होतं कीं इतर मुलींचे बाप तेवढे वेडे व मी मात्र शहाणा ! पण नाहीं, मीही वेडाच दिसतोंय् !

( एकीकडे होतात. )

पदम०— ( हळूच ) शूः शूः, तिकडे ! हें बघ तिकडे ! ( हळूच टाळ्या वाजविते ! ) हें बघ इकडे नव्हे, तिकडे ( हंसून ) प्रेमाला भाळलेल्या तरुण-तरुणींशीं खुणेनं बोलायचं ह्मणजे मोठं कठिण आहे बाई ! छेः ह्यांचं हें सगळंच मुलखानिराळं ! त्यांना अन्धारांत दिसायला लागवं, खुणांनीं बोलायला येतं आणि रेशमी दोरीशिवाय एकमेकांना बान्धून ठेवायला सांपडतं !

पद २२ वें

प्रेम वाटे जादु भारी मंत्रतंत्र कज्जला ॥ धृ० ॥ प्रेमनेत्रीं दृष्टि रात्री । नेम ऐसा गाजला ॥ १ ॥ प्रेम वाटे, रेशमी कीं पाश दोघां साजला ॥ २ ॥ प्रेम जोडी बोलि थोडी, नेत्रभाषा त्यांजला ॥ ३ ॥

( पुन्हां टाळ्या वाजवून ) शूः, शूः, तिकडे तिकडे म्हणतें ना !

( जाते )

छत्र०—( बाहेर येऊन ) ‘ शूः, शूः; तिकडे ’ ? हा काय प्रकार आहे ? पण बघूं या काय काय गंमत होते ती ! ह्या पदमकुंवारीला इथें बघून मला खूप राग आलेला होता ! पण छेः ! आतां कुणावर रागावायचं नाहीं ! हें सगळं बघायचं ! खरोखर, हें सगळं बघायला लागल्यापासनं मला असं वाटायला लागलेलं आहे कीं, माझ्या तारुण्यांत प्रियतमेला वश करतेवेळीं मी ज्या ज्या प्रेमलीला केल्या त्यांचीच मी आज उजळणी करीत

आहें ! वाहवा ! वाहवा ! ह्या नुसत्या प्रेमळ आठवणींनीं देखील मला पुन्ह तारुण्य यायला लागलेलं आहे ! मग ही तर काय ? प्रत्यक्ष तरुण माणसं ( चेष्टेनें ) शूः शूः तिकडे ! शूः शूः ! तिकडे ! ( एके बाजूला होतात. )

(छत्रसालांचा थोरला मुलगा प्रवेश करतो.)

थो० मु०—( स्वगत ) तिकडे ? काय, तिकडे ? ती तिकडे आहे वाटतं ! पण इतक्यांत ती तिकडे कशी गेली असेल ! पण गेलीही असेल ! नाहीं तरी कसं ह्मणावं ?

छत्र०—( पडद्याबाहेर डोकावून ) शूः शूः तिकडे !

थो० मु०—( स्वगत ) ( त्यांना न पाहातां ) काय तिकडे ? बरं आहे, तिकडे जातों ! ती जिकडे असेल तिकडे मी जातों ! ( जातो. )

छत्र०—( बाहेर येऊन ) हे आमचे थोरले चिरंजीव ! हेही आज 'ती' ची भाषा बोलायला लागलेले आहेत ! आज ह्या भाषेशिवाय कुणी प्रवेशच करीत नाहींत ! ह्या तरुण लोकांना आज झालंय् तरी काय ? बाकी ह्या सगळ्यांच्या दुखण्यावर औषध एकच ! आणि तें औषध ह्मणजे 'चोरून चुम्बन !' ( एकीकडे होतात. )

( छत्रसालांचा दुसरा मुलगा प्रवेश करतो. )

दु० मु०—( स्वगत ) मी तिचं किती वेळां तरी चोरून चुम्बन घेतलं, पण मनाचं समाधान कांहीं झालं नाहीं !

छत्र०—( पडद्याचे बाहेर डोकावून ) हे आमचे दुसरे चिरंजीव ! ह्यांनीं तिचं चोरून चुम्बन घेतलं म्हणे !

दु. मु.—( त्यांना न पाहतां ) पण कांहीं मनाचं समाधान झालं नाहीं असं वाटतंय्—

छत्र०—( बाहेर डोकावून ) काय वाटतंय् आणखी ? होऊं द्या ! आज सगळी झडती होऊं द्या माझ्या समोर ! अगदीं शिल्लक बाकी शून्य ! पुन्हां असा प्रसंग तुह्मालाही सांपडायचा नाहीं न् मलाही सांपडायचा नाहीं ! अहो, एखाद्या शिक्षकापुढें एखादा पाठ तोण्डपाठ ह्मणावा त्याप्रमाणें

आपला प्रेमपाठ हा माझ्या पुढें अगदीं बिनदिक्कत ह्मणत आहे ! ह्मणे मला असं वाटतंय्——

दु. मु.——( स्वगत ) मला असं वाटतंय् कीं तिचं अक्षय चुम्बन घ्यायला सांपडावं ह्मणून तिला एकसारखी हृदयाशींच धरावी.

छत्र०——( डोकावून ) अगदीं एकसारखी हृदयाशींच धरावी अं !

दु. मु.——हृदयापासनं अगदीं दूर ह्मणून ठेवूं नये !

छत्र०——( डोकावून ) अरे वाः रे बहाद्दर ! काय पण रंगांत आलाय् गडी ! वाः ! वा ! ह्याला ह्मणतात पुत्र ! आज ह्या बापाला धन्य केलंन् बोवा !

दु. मु.——चला, तिचं पुन्हां एकदां चोरून चुंबन घेतलं पाहिजे ! [जातो]

छत्र०——मोठ्या कामगिरीवर गेला बोवा ! तरुण लोकांना कसलं आलंय् राज्य न् कसला आलाय् कारभार ! हे असले उद्योग पाहि-जेत ! ह्मणजे त्यांचा दिल खूष ! ( पडद्याकडे पाहून ) वाहवा ! या तुह्मी ! या तुह्मी ! आज माझ्या चारी मुलांच्या लीला पाहण्याचा दिवस दिसतोय् ! मी मात्र दिवाणखान्यांतल्या समयीप्रमाणं हें सगळं बघत इथें उभा आहें ! ( आड उभे राहातात. )

( मस्तानी आणि पदमकुंवारी एकमेकींच्या गळ्यांत गळा घालून प्रवेश करतात. )

पदम०——अशा वेळीं असं डोळ्यांत पाणी आणूं नये !

मस्तानी——ताई, मी मुद्दाम का आणतें आहे पाणी ! पण पुष्कळ वेळां डोळे ऐकेनासे होऊन कारंजीं उडवूं लागतात.

पदम०——अग, ही पुढची लक्षणं आहेत ! येत्या रंगपंचमीला तुह्मीं दोघं पुण्यांत असाल, आणि एकमेकांच्या अंगावर अशीच कारंजीं उडवाल ! मस्तानी, पुण्यांत रंगपंचमीला तिथें काय काय मजा उडेल ती सारी हकीकत मला कळविशील ना पण ?

मस्तानी——ताई, मी तें कसं विसरेन ? ताई, आह्मीं जो जो क्षण आनन्दांत घालवूं त्या त्या प्रत्येक क्षणीं तुझी दुप्पट आठवण होत जाईल ! ( पुनः अश्रु ढाळते )

पद्म०—( तिच्या पाठीवरून हात फिरवून ) उगी, अशा वेळीं डोळ्यांत पाणी आणूं नये ह्मटलं ना ।

मस्तानी—ताई, तुझ्या विरहाचं मला इतके वेळ कांहीं वाटत नव्हतं, परन्तु आतां मात्र तुझा विरह ह्मणजे डोंगराचा एक मोठा कडा आहे असं मला वाटायला लागलेलें आहे !

पद २३ वें

विरहशैलाचे हे कडे । वरती चढूं कैसी गडे ? ॥ धृ० ॥ प्रणयागिरि गमत गे साजिरा । युवतिजन हृदयिं हा लाजरा । करि तनुसि भीती जर्जरा, धैर्य कांहीं नुरे मज जरा । कठिण कोडें मजला पडे ॥ १ ॥

पद्म०—(तिच्या पाठीवर हात फिरवून) पण तो कडा कडेलोट होण्याकरितां नाहीं तर प्रियकरानं तुला हातांत झेलावं ह्मणून आहे ! अग, माहेरच्या माणसाच्या विरहपर्वतावरनं कडेलोट झाल्याशिवाय प्रियकराच्या प्रेमाचा सुन्दर झोंपाळा बसायला मिळत नाहीं ! हें बघ, मुलींचं आयुष्य ह्मणजे एक झेलाझेलीचा खेळ आहे ! आईबाप तिला लहानपणीं अंगाखांद्यावर झेलीत असतात आणि आईबापांचं झेलणं सम्पलं कीं तिचा प्रियकर तिला नेमकं झेलून धरतो !

मस्तानी०—पण ताई, माहेरच्या माणसांचं प्रेम आणि प्रियकराचं प्रेम ह्यांच्या दरम्यान माझ्या मनाचा मात्र ह्यावेळीं झोंपा पाळणा होऊन गेलेला आहे !

[ छत्रसाल प्रवेश करतात. ]

छत्रसाल—पण मस्तानी—

दोघी—अगबाई बाबा ! अगबाई बाबा !

छत्र०—मस्तानी, मी आतां तुझा बाबा नव्हे ! तुझ्या विरहाचं दुःख कसं सहन होईल अशी काळजी पडलेला एक कष्टी जीव आहे ! धनुष्यापासनं बाण सुटला ह्मणजे तो सावजाला घायाळ करतो, परन्तु मुलगी हा

असा एक चमत्कारिक बाण आहे कीं तो ज्याच्याकडे गेला त्याला प्रेमानं घायाळ करतो आणि ज्याच्यापासनं सुटला त्याला विरहानं घायाळ करतो !

मस्तानी—बा—बा—आपल्याला—वि—चार—ल्या—वां—चू—न

छत्र०—( तिच्या तोण्डावरून हात फिरवून ) बाळे, तें सर्व मला माहीत आहे. तूं केलंस तेंच योग्य केलंस ! तुझ्यासारखं रत्न बाजीरावा-सारख्या पुरुषाला अर्पण झालं ह्यांतच माझा गौरव झाला !

[ छत्रसालचा थोरला मुलगा प्रवेश करतो. ]

थो. मु.—मस्तानी, ह्या वेळीं माझाही आशीर्वाद घे ! श्रीमन्त बाजी-रावांची तुझ्यावर अखण्ड प्रीति राहो !

[ मस्तानी त्याला नमस्कार करते. ]

छत्र०—( हंसून ) अरे ! तूं तिकडे गेला होतास ना ! मग 'ती' सांपडली का तुला तिथें ?

थो. मु.—( हंसून ) बाबा, आपल्याला कसं कळलं हें ?

छत्र०—( हंसून ) अरे, वाटेल तसं कळलं ! पण ती तिथें सांपडली कीं नाहीं तें तर सांग अगोदर !

थो. मु०—होय बाबा, ती तिथेंच होती. ती बाजीरावसाहेबांची स्वारी अगदीं तिथेंच होती !

छत्र०—( आश्चर्यानें ) ( स्वगत ) ह्मणजे ? हा बाजीरावसाहेबांची स्वारी का पहात होता ? अहो ! मी अगदीं पक्काच मूर्ख आहें ह्मणायचा ! मुलींचे बाप असेच वेडे असतात !

[ छत्रसालांचा दुसरा मुलगा प्रवेश करतो. ]

दु. मु०—कोण, मस्तानी ? तुला माझा आशीर्वाद असो ! ज्याप्रमाणें कृष्णाच्या नांवाबरोबर राधेचं नांव शिवलेलं आहे, त्याप्रमाणं बाजीराव-साहेबांच्या नांवाबरोबर तुझंही नांव शिवलं जावो ! ( मस्तानी नमस्कार करते. )

छत्र०—( एकीकडे ) कायरे, तूं चोरून चुम्बन घ्यायच्या तयारींत होतास ना !

दु. मु०—( आश्चर्यानें ) ( एकीकडे ) बाबा, हें तुह्मांला कसं कळलं ?

छत्र०—( हंसून ) अरे ! कळलं असंच ! पण हें खरं आहे ना ?

दु. मु०—हो, खरं आहे बाबा ! ही पहा बाजीरावसाहेबांची तसबीर ! मी हिला अगदीं हृदयाशीं धरलेली आहे आणि वेळ सांपडला कीं मी हिच्या पदतलाचं चोरून चुम्बन घेत असतों !

छत्र०—( आश्चर्यानें ) ( स्वगत ) ह्मणजे ? मी अगदीं पक्का वेडा ठरतों कीं ! शेवटीं मुलींचे बाप वेडे असतात हेंच खरं !

पद्म०—भाई, आण ती तसबीर इकडे ! ही तसबीर आणि ही मस्तानी ! ह्या बाजीराव--मस्तानींना मी आपला आशीर्वाद देतें ! ह्यापुढें हिन्दुस्थानचा इतिहास कांहींही वळणं घेवो, पण बाजीराव—मस्तानी हें नांव हिन्दुस्थानच्या इतिहासांत सुवर्णाक्षरानं झळको ! ( मस्तानी पद्मच्या गळ्यांत पडते )

छत्र०—मस्तानी, जा, जा, लवकर ! ही पहा हत्तीवरनं आलेली बाजीरावसाहेबांची स्वारी ! ( सर्व लगबगीनें पडद्याआड होतात. )

[ ह्यानन्तर हत्तीवरून बाजीरावसाहेब येतात. ते मस्तानीला हत्तीवर घ्यायला लागतात. ती चढत असतां प्रेक्षकांस दिसते, व हा देखावा दिसत असतांनाच पडदा पडतो. ]

---

## अंक दुसरा

### प्रवेश तिसरा

[ दौलतराव प्रवेश करतो ]

दौल०—अन्तुभटजींनीं सांगितल्याप्रमाणें उत्तरेकडे आलों परन्तु अजून तरी कांहीं दैव उघडल्याचं चिन्ह दिसत नाहीं ! काय करावं बरं आतां ? पहावं आतां इथें तरी खडा टाकून ! ( एक खडा उचलतो व मारतो. )

( पडद्यांत " ये कौन है गधा ? " )

' गधा ' ? अरे, हा कुणातरी बाईचा आवाज दिसतोय् ! अरे, मजा झाली खूप ! ह्मणतात ना, माणसानं कधींही निराश होऊं नये ! कुठें तरी खडा टाकून पहावं ! ( पुन्हां खडा मारतो. )

( पडद्यांत—" मिय्यां " " मिय्यां " । ]

अरे वाः ! ही कुणी बाईच खास ! आपला खडा कसा नेमका लागला ! खरोखर, माझं माग चुकलंच ! परस्त्रीशीं कधीं ताबडतोब लगट करूं नये. प्रथम फक्त लाम्बनं खडा मारावा ! ( हंसून ) परस्त्रीला खडा मारायचा धडा आपण आजच पहिल्यान्दा शिकलों बोवा ! चला, पुनः एकदां खडा टाकावा ! ( पुन्हां तसें करतो. )

( पडद्यांत—" मिय्यां, मिय्यां, ये देखो कोई मेरी मस्करी कर रहा है " )

दौल०—( हंसून ) अरे, ही कुणीतरी मुसलमानीण दिसतीय् ! बाजीरावाचंन् माझं नशीब अगदीं सारखं आहे बोवा ! बाजीराव उत्तरेकडे आला—मीही उत्तरेकडे आलों ! बाजीरावाला मस्तानी मिळाली—मलाही कुणीतरी मुसलमानीणच मिळणार !

( ऐ गधे, ऐ गधे )

( बायकी आवाज काढून ) आजाव ! प्यारी आजाव !—ये तेरा गधा इधर खडा है !

( गुलामकादर दण्डा घेऊन प्रवेश करतो त्याला दौलतराव घाबरतो. )

अरे, हें कोण ? कुणी तरी बाई भेटेल ह्मणून मी खडा टाकीत होतों, पण बाईच्या ऐवजीं हा कुणी धांगडखांच खडा ! पण आतां घाबरतां उपायोगीं नाहीं ! हा प्रसंग युक्तीनेंच निभावला पाहिजे !

गुलाम कादर—( रागानें ) ऐ गधे—

दौलत०—( आदबीनें ) जी हां !

गुलाम०—मेरी प्यारीसे दिल्लगी करता है ? तूं जानता नहीं के मैं निजाम उल्मुल्कका खास खिदमत गुजार हूं !

दौलत—( स्वगत ) अरे ! ही निजामउल्मुल्कसाहेबांची छावणी दिसतीय् ! आतां आली आपली कम्बख्ती !

गुलाम०—ऐ गधे—

दौलत—( आदबीनें ) जी हां !

गुलाम—तूं मानता नहीं कि—

दौलत—मिय्यां साहेब, मैं सब कुछ जानता हूं ! आप साहेब आला हजरतके खास खास नौकर है ! मैं खूब जानता हूं ! इस लिये मैं यहां आया हूं ! मैभी कोई मामुली आद्मी नहीं हूं ! मैं आला दरजेका आद्मी हूं !

गुला०—( स्वगत ) ये कोई बुजुर्ग आद्मी होगा ! ( उघड ) आप कौन हैं ! आपकी तारीफ ?

दौलत—( स्वगत ) हें बरं झालं आतां ! अगदींच ' अरे तुरे ' होतं तें ' आप ' वरती आलं ! आतां दण्ड्याची भीति राह्यली नाहीं ! ( उघड ) मैं बाजीरावसाहेबका सरदार हूं !

गुला०—क्या ? आप सरदार हैं !

दौलत—( गुलामचे कानांत ) देखिये, बाजीराव मेरे काबूमें हैं ! मुझे आला हजरतके रूबरू ले चलिये ! इनशा अल्ला ! मैं कोई खिदमत् ऐसी निकालूं गा, जिसमें आपका और मेरा उमदा फायदा निकल आये गा !

गुला०—तो फिर चालिये !

दौल०—नहीं नहीं आप चलिये !

गुला०—नहीं नहीं आप चालिये !

दौल०—नहीं नहीं आप चलिये ! ( दोघे जातात )



पद्मः—हीं पांखरं कशी भर्रदिशी उडून गेली ! ( पान ६९. )

[ ह्यानन्तर आपले छावणींत बसलेला निजामउल्मुल्क दिसतो. त्याचे हातांत बाजीराव साहेबांची तसबीर असते. ]

निजा०—( स्वगत ) कैसी उमदा तसबीर है ! बाजीरावकी सुरतभी कैसी खूपसूरत है ! ये क्या खाता है ? भुट्टा खाता है ! घोडेपर सवार होकर भुट्टा खानेवाला हमनें अबतक् न देखा ! जरूर इस्में कोई गलती होगी ! उस् इटालियन् शख्सकी जरूर कोई चालाकी होगी ! आज हम् पोशिदा पोशिदा बाजीरावको मुलाहिजा फरमाएँगे और ये तस्बीर राही है या गलत है देख लेंगे ।

( निजामची पत्नी प्रवेश करते. )

वाः ! आगई हमारी बेगम साहेबा ! ये तस्वीर उस्की नजरसे न गुजरे !

बेगम—मैं आतेही कोईसीभी शय् मुदाम आप छुपाते रहते हैं !

निजा०—बीबीसाहेबा, सवेरेही तशरीफ क्यं ले आई ?

बेग०—बीबीयोंका फर्ज है कि बार बार अपने खाविन्दसे मिलती रहें !

निजा०—इस सबामें इतनी खुनकी है कि आपकी नाजुक तबा बिगड जायगी !

बेग०—क्यं ? मेरी आमदभी आपको भाती नहीं ? जरूर आप किसी गैर माहरूमसे दिल लगाये हुवे हैं ! और उस्की तसबीर छपाये हुवे हैं !

निजा०—बीबीजान, आप कुछ भी कहो !

बेग०—मुशाफिकेमन्न्, बादेसबासे औरतोंकी तबीयतमें खलल् पैदा न होगा !

निजा०—क्यं ? सरद हवासे औरतोंकी तबामें खलल् पैदा न होगा तो किससे होगा ?

बेग०—जिस वख्त प्यार करनेवाले खाविन्दका दिल ठण्डा हो जाता हैं उस वख्त देखिये हमारे नाजूक जिस्ममें हसरत का ज्योश पैदा होता है !

निजा०—( बेगमचा हात धरून ) ये हक है ! इस्की वजे क्या है ?

बेग०—इस्की वजे ये है कि हमारा मोहिब्बेमन हमें भूलकर किसी जगादिल लगाये !

निजा०—क्यं ? हम आपको भूल गये ?

बेग०—हां ! भूल गये !

निजा०—दुसरी औरतसे दिलजोई और प्यार होने लगा ?

बेग०—हा होने लगा !

निजा०—हम बेवफा होगये ?

बेग०—जी हो गये !

निजा०—ये किस्का खियाल होगा कि देहलीके बादशाहका वजीरे ए–आजम् निजामुल्मुल्क अपनी प्यारी बीबीसे किसी वख्तभी बेवफा होगा–इस्की गवाह कसोऽनाकसदे सकता है !

बेग०—खूब ! इस बाबद कोई गवाहभी होगा ?

निजा०—गवाह ?

बेग०—हां है ! और वो फिल्हाल मौजूद है !

निजा०—कौन ? कौन ? ( तसबीर पडते. )

बेग०—( तसबीर घेऊन ) ये गवाह देख लीजिये !

निजा०—( हंसून ) बीबी जान, इससे आपको क्या इजहार होता है ?

बेग०—यही आपकी मुशफिकाह !

निजा०—क्या ! ये मुशफिकाह है ?

बेग०—( तसबिरीकडे पाहून ) ( पश्चात्तापानें ) ये मुशफिकाह नहीं ! ये हमारी भूल !

निजा०—ये हमारी भूल नहीं, ये मोहोब्बतकी भूल है! सच्चे मोहोब्बतका ये दस्तूर है कि जिस मोहब्बतमें मुदाम अन्देशा हो! आपकी भूलसे हमें मालूम होता है कि आप सिद्क दिलसे हमपर फिदा है! खैर! प्यारी, ये बाजीरावकी तसबीर है!

बेग०—क्या? बाजीरावकी? कैसी खूब और हसीन है?

निजा०—( हंसून ) औरोंकी मुसर्सीफ्–आज बडी खूबीसे पाक हो गये! ( पडद्याकडे पाहून ) औ हो! ये कौन है?

[ बीबी जाते. गुलामकादर व दौलतराव येतात. ]

निजा०—एँ? ये कौन गधा?

दौल०—हुजूर, ये बन्दा गधा नहीं! एक खास सरदार है!

निजा०—तेरी सूरतसे हमें मालूम होता है कि तूं झ्यूट कहेता है!

दौल०—हुजूर, मेरी सूरतही ऐसी है!

निजा०—खूब! गुलमकादिर, इस गधेको कचेरीमें ले आव! वहां सुन लेंगे! ( जातो )

गुलाम०—ऐ गधे–( स्वगत ) इस्को ऐसाही कहेना चाहिये!

दौल०—गधे? साहेब, एक अर्ज है!

गुलाम०—कहीये! कहीये!

दौल०—मुझे फक्त गधा न कहीये!

गुलाम०—तो क्या कहे?

दौलत०—कमसे कम गधेसाहेब कहेना!

गुलाम०—आच्छा! चलिये, गधेसाहेब, चलिये!

दौल०—आप चलिये!

गुलाम०—नहीं नहीं आप चलिये!

दौल०—नहीं नहीं आप चलिये!

गुलाम०—नहीं नहीं आप चलिये!

दौल०—नहीं नहीं आप चलिये!

[ जातात. ]

( अंक दुसरा समाप्त )

## अंक तिसरा

### प्रवेश पहिला

( पदमकुवारी अस्वस्थ स्थितींत प्रवेश करते )

पद्म०—बस्स ! आपला आतां निश्चय ठरला ! आतां इथें रहायचं नाहीं, आतां धावडशीला ब्रम्हेन्द्रस्वामींच्या मठांत जायचं व तिथें आपलं आयुष्य घालवायचं ! परमेश्वरसेवेचं अमृत माझ्या हृदयाच्या जखमा खास बऱ्या करील ! ह्या जगांत एक पतीचं प्रेम, किंवा परमेश्वराचं ! त्याशिवाय सर्व प्रेमं व्यर्थ आहेत !

पद २४ वें

( चाल—हमसे करनार )

वनिता प्रिय होती दोन । प्राणपती प्रेमभुवन ।
ईश करित परि तद्वन । पतिला जेव्हां दया न ।
पतिविना नमी अनाथ । देई धैर्य उमाकान्त ।
आतां मन होइ शान्त । त्वरित तेचि चरण धरित ॥ १ ॥

अगबाई ! बाबांच्या कानांवर ही गोष्ट कशी—घालवावी ?

( छत्रसाल प्रवेश करतो )

छत्र०—( तिला पोटाशीं धरून ) बाळ, मस्तानी गेल्यापासनं काय ही तुझी दशा ! बेलाच्या त्रिदळांतनं एक पान खुडावं त्याप्रमाणें मस्तानी गेल्यामुळं तूं आणि मी—दोघेही बापुडवाणी दिसायला लागलेले आहोंत।

पद्म०—बाबा, ( खिन्न होऊन ) मी आतां इथनं जाण्याचा विचार केलेला आहे ! ( छत्रसाल दचकतो ) आतां मला इथं रहावत नाहीं ! त्रिदलाची गोष्ट तुम्ही बोललांत ती खरी ! पण बाबा, त्या त्रिदळांत मी नव्हतें—तुम्ही, मस्तानी न् आणखी एक माणूस होतं !

छत्र०—आणखी एक माणूस ? कोण बरं तें ? बाळे, असा कोणता भाग्यवान राजपुत्र आहे कीं ज्याच्यावर तुझं मन बसलं ?

पद्म०—बाबा, मी माणूस म्हटलं! 'राजपुत्र' म्हटलं नाहीं!

छत्र०—म्हणजे राजपुत्र माणूस नव्हे का?

पद्म०—बाबा, तें मी काय सांगू? पण आपल्या हिंदभूमींत सध्यां असा एकच वीर पुरुष आहे कीं जो "माणूस" ह्या पदवीला पात्र आहे! होय ना बाबा? होय ना बाबा?

छत्र०—( स्वगत ) हिचंही मन बाजीरावावर बसलं कीं काय? बाळे, बाजीरावावर का तुझं मन बसलं?

( पद्मकुंवारी लाजते )

काय तुझंही मन बाजीरावावर बसलं?

पद्म०—होय, त्याच वीरपुरुषावर!

छत्र०—पद्म, तूं मला आनन्दांत आणि दुःखांत एकदम ढकलून दिलेलं आहेस! रविकिरणांचा विकास आणि रवितापाचा ताप ह्या दोहों-चाही मला एकदमच अनुभव यायला लागलेला आहे! पद्म, तुझं प्रेम अगदीं योग्य ठिकाणीं जडलं, पण तें सफल होईल कीं नाहीं ह्याचा मात्र मला संशय आहे.

पद्म०—पण बाबा, त्याबद्दल मला संशय नाहीं! त्याचा निकाल लागून गेलेला आहे!

छत्र०—( आनन्दानें ) काय बाजीरावांनीं तुझाही स्वीकार केलेला आहे?

पद्म०—( डोळे पुसून ) नाहीं! माझा त्यांनीं अव्हेर केलेला आहे! ( गहिंवरून ) बाबा, आतां मला जास्त विचारूं नका. मला इथनं जायची परवानगी द्या!

छत्र०—पण बाळ, तूं जाणार कुठें?

पद्म०—मी आतां महाराष्ट्रांत जाणार व ब्रह्मेन्द्रस्वामींच्या मठांत रहाणार!

छत्र०—काय, तूं आतां महाराष्ट्रांत जाणार?

पद्म०—होय बाबा! आतां माझ्या जिवाचा ओढा महाराष्ट्राकडे लागलेला आहे! बाबा, ही महाराष्ट्रभूमि मला पालवित आहे! महाराष्ट्र-भूमीची भेट घ्यायला मला आतां निरोप द्या आणि मुलगी सासरीं निघाली ह्मणजे ज्याप्रमाणं एकीकडे विरहानं डोळे पाझरत असतात आणि एकीकडे आनन्दानं हृदय पाझरत असतं त्याप्रमाणं बाबा, तुमची न् माझी ताटा-तूट होत असतांही तुमचं हृदय आनन्दानं पाझरूं द्या! बाबा, मी आतां सासरीं निघालेलें आहे. महाराष्ट्र हें माझें सासर आहे.

छत्र०—अहाहा! काय हा दैवयोग!

पद्म०—बाबा, तुमच्या हृदयाला फार का कष्ट होत आहेत?

छत्र०—होय, अतिशय कष्ट होत आहेत; पण त्याबरोबरच दैवाच्या घटनेचंही मी आश्चर्य करतों आहें! कारण पद्म, (तिला जवळ घेऊन) इतके दिवस न सांगितलेली एक गुप्त गोष्ट तुला सांगायची आहे! ती गोष्ट ही कीं तूं बुन्देलखण्डची राजकन्या नसून एक महाराष्ट्र—कन्यका आहेस!

पद्म०—काय? मी महाराष्ट्र—कन्यका? मी बुन्देलखण्डची राजकन्या नव्हे? मी तुमची मुलगी नव्हे?

छत्र०—(तिला जवळ घेऊन) प्रेमानं तूं माझी मुलगीच आहेस, किम्बहुना मुलीपेक्षांही तूं मला जास्ती आहेस! पण बाळे, तुझा जन्म आमचे वंशीं व आमचे कुशीं झालेला नसून एका महाराष्ट्रीय वीराच्या पोटीं तुझा जन्म झालेला आहे! ज्या वेळीं बाळाजी विश्वनाथ पेशवे दिल्लीवरनं विजय मिळवून आले त्यावेळीं लढाईत कामास आलेल्या एका महाराष्ट्रीय वीराची कन्या त्यांनीं मला अर्पण केली! पद्मकुंवारी, तीच तूं! मला आश्चर्य इतकंच वाटतं कीं चमत्कारिक योगायोगामुळें फिरून महाराष्ट्रभूमीकडे तूं निघालेली आहेस! पद्मकुंवारी, महाराष्ट्र हें तुझं सासर नसून माहेर आहे!

**पद्म०**—( डोळ्यांत पाणी आणून ) मग बाबा, मी माहेरीं चाललें—आपल्या मातेकडे चाललें ! वन्देमातरम् ! बाबा, वन्देमातरम् !

**छत्र०**—( डोळ्यांत पाणी आणून ) वन्देमातरम्, वन्देमातरम् ! परमेश्वर तुझा प्रतिपालक होवो ! तुझ्याबरोबर लवाजमा आणि निवडक सैन्य द्यायची मी आतां आज्ञा करतों. ( जातो )

**पद्म०**—आतां मी महाराष्ट्रमय झालेलें आहे ! आतां मला महाराष्ट्राशिवाय कांहीं एक सुचत नाहीं ! माझं रक्त, माझे स्नायु, माझा श्वासोच्छ्वास आतां महाराष्ट्राची हवा चाखीत आहेत ! पण-पण—पण काय ? अजून ह्या महाराष्ट्राच्या पडद्याआड माझा बाजीराव मला दिसत आहे हा पहा—हा पहा—हा पहा बाजीराव हा पहा बाजीराव !

[ ट्रॅन्सफर सीन. पदमकुवारी अदृश्य होते. एका अरण्याचा सीन. एका सरोवराचे कांठावर बाजीराव बसलेला आहे व मस्तानी त्याला कणसें आणून देत आहे. ]

**मस्तानी**—आणखी सोलूं का दोन कणसं ?

**बाजी०**—हं सोल ! निर्मळ शेतांतलं हें नैसर्गिक अमृत कितीही चाखलं तरी मनाची तृप्ती होत नाहीं !

**मस्तानी**—पण हें पाहून लोक काय ह्मणतील ? मराठी साम्राज्याचा धुरंधर राज्यकर्ता आणि मराठी सेनेचा सर्वविख्यात सेनापती पक्वान्नं सेवन करण्याच्या ऐवजीं कणसं खात बसलेला आहे असं जर कुणी पाह्यलं तर त्याला किती आश्चर्य वाटेल ? [ निजामउलमुल्क वेषांतरानें एका झाडीआड प्रवेश करतो. ]

**निजाम०**—किसीने देखा, ये शुबा क्यों ? मै यहां बाजीरावको देखनेके लिये आया हूं ! उस्को देखकर ताज्ज्युबसे शल् होगया हूं. कैसी इसकी सादगी ! इस्की ये सादगी, जहांके बहादरों को जैर निगाह करेगी !

**मस्तानी**—हे घ्यायचे होते कणसाचे दाणे !

बाजी०—आण, आण पाहूं ! अग, हे पदार्थ हलके आहेत असं समजूं नको ! सृष्टिमातेनं पृथ्वीच्या पेल्यांत घालून दिलेले हे कणसाचे दाणे आसु-रवाडीस सासुबाईंनीं रुप्याच्या पेल्यांत घालून दिलेल्या हलव्याच्या दाण्यां-पेक्षां खात्रीनं कमी योग्यतेचे नाहींत !

मस्ता०—मी तर ह्मणतें कीं ते जास्त योग्यतेचे आहेत !

बाजी०—काय ? तुलाही असं वाटतं ?

मस्तानी—कुणालाही असंच वाटेल ! कोणत्याही सासूपेक्षां सृष्टिमाता जास्तीच दयाळू ठरेल !

बाजी०—अगदीं तुझी आई असती तरी तिच्यापेक्षां देखील ?

मस्तानी—इश्श् ! कांहीं तरी भलतंच काढायचं !

बाजी०—भलतंच कसलं ? मी तर ह्मणतों कीं माझी आई असती तर तिच्यापेक्षां देखील सृष्टिमातेचं हें जिवन्त दान जास्त सरस ठरलं असतं !

मस्तानी—( हंसत ) सृष्टिमातेच्या ह्या जिवन्त दानामुळेंच इकडच्या पराक्रमांत जास्त जिवन्तपणा आला आहे वाटतं !

बाजी०—ह्यांत काय संशय ? मस्तानी, मेलेल्या जनावरांचं मेलेलं मास खाऊन आंगांत ताकत आणण्याची पुष्कळांना आशा असते ! पण असे वीर देखील माझ्या तरवारीपुढें चीत झालेले आहेत हें लक्षांत ठेव ! आणि ह्याचं कारण सृष्टिमातेचं हें जिवन्त दूध ! माझ्या महाराष्ट्रांतली कृष्णाकांठची ज्वारी आणि माझ्या महाराष्ट्रांतली मक्याचीं कणसं हीं माण-सांना इतकी ताकत देतात कीं त्यांच्यापुढें मेलेले मांसरस आणि कढवलेले पक्वान्नरस तुच्छ आहेत, समजलीस ! माझ्या महाराष्ट्रांतले कान्दा न् भाकर खाऊन राहाणारे गरीब शेतकरी ह्यांचं हाडपेर जसं कणखर असतं तसं तूपरोटीचा खुराक असणाऱ्या खन्द्या शिपायांचं देखील आढळायचं नाहीं ! कान्दा न् भाकर खाऊन रहाणाऱ्या मराठी शिपायांपुढें मोठमोठ्या वैभवशाली बादशहांचीं मिजासखोर सैन्यं देखील जीं हार खातात त्याचं

कारण हें आहे. मस्तानी, माझ्या महाराष्ट्रांतली ज्वारी गव्हाच्या तोंडांत मारील, आणि माझ्या महाराष्ट्रांतल्या कृष्णावेणांचं शुद्ध पाणी पौष्टिक पाकालाही पाणी चाखायला लावील.

निजाम०—( स्वगत ) ये मरेठे ताक्तवर होते हैं, इस्की वज्येह आज वखुबी मालुम हुई, कुवत खुराक मे नही, इष्कबाजी और दौलत मन्दीमे भी नहीं ! सिर्फ ज्योषमें है ! ये ज्योष, कुश्नानदीका आब्बे मुसफ्फा, और दखनकी जिरा आतमे पैदा होनेवाली ज्यवारमे है. जिस्की वजेह, ये मरेठे होसे ताकदवर होते हैं के, काबुल कंदाहारके नौजवान ताकदवर कद्दावरोसे भी सबकत ले गये हैं. इस जहामें अमीर कौन और मिस्कीन कौन ? मिस्कीन वो के जिस्के दिलमें ज्योषो खुरोष नहीं. और अमीर वो के जिस्के दिल ज्योषो—खुरोषमें भरा हुवा हो ! ये मरेठे खुदाने बनाये हुवे कुदरतन अमीर हैं !

मस्तानी—हें ताकतीचे सम्बन्धानें झालं, पण सौन्दर्याचं कारण काय ? इकडे इतकं सुन्दर कशामुळें असायचं झालं ? आपला जन्म बघितला—( लाजते )

बाजी०—( हंसून ) अग, लाजूं नका ! खरंच तसं आहे ! आम्ही नुसते नांवाचेच भट नाहीं—आम्ही खरेखुरेच कोकणचे भट आहोंत ! आम्ही आतां नांवारूपाला चढलों म्हणून आह्मी मूळ भट होतों हें कबूल करायला कांहीं लाजायचं कारण नाहीं—!

मस्ता०—मग मीं ह्मणतें कीं मदनालाही लाजविण्याजोगं ज रूप आपल्याला प्राप्त झालं तें कुणामुळं ? गडे खरंच सांगू आपल्याला—हें पहा आपल्याला पहिल्यान्दां पाहिलं तेव्हां आपल्या साण्डल्या देखणेपणामुळें मी इतकी भारून गेलें कीं आपल्या पुढनं निघून जावं इतकी शक्तिच माझ्या पायांमध्यें राह्यली नाहीं ! ही माझी दृष्टी आपल्या रूपाचं एकसारखं प्राशन करीत होती तिची तृप्तिझाली नाहीं—आणि—

बाजी०—( तिचे हनुवटीस हात लावून ) आणि काय ?

मस्तानी—आणि मी आपल्याला खरं सांगतें कीं अजून सुध्दां तिची तृप्ति झालेली नाहीं !

पद २५ वें

पुरी जाहाली ना लालसा ॥ धृ० ॥ दर्शनाचि आशा । मुख रोज पाही । ये, भेट देई । नवी वाटे लालसा ॥ १ ॥

बाजी०—( तिचें चुम्बन घेऊन ) ऊं: ! कांहीं तरी थट्टा करते आहेस झालं ! तुह्मां बायकांना अगोदर कशाचं वर्णन करायला नको आणि त्यातनं माझ्यासारखा कुणी गरीब सांपडला म्हणजे चढवलाच त्याला हर-भराच्या झाडावर !

मस्तानी—( हंसून ) आह्मी चढवूं हरभऱ्याच्या झाडावर, पण इकडनं चढायला पाह्यजे ना !

बाजी०—न चढायला काय झालं ? तुह्मी स्त्रिया काय कराल न् काय नाहीं ह्याचा कांहीं नेम आहे का ? अग, तुमचं सामर्थ्य तुह्माला माहीत नसेल पण आह्माला पूर्ण माहीत आहे !

मस्ता०—( हंसून ) काय, काय तें सामर्थ्य !

बाजी०—अग, निजामसारख्यांनाही हार न जाणारा हा बाजीराव—

निजाम०—बाजीराव तू सच बोला. इस दुनियामें तू ही जवानमर्द है. इस दुनियामें एक बाजी और सब पाजी !

मस्ता०—तो सुद्धां माझ्यापुढें हार गेला असंच म्हणायचं ना ? मी कसं ओळखलं ! मी कसं ओळखलं !

बाजी०—अग, तूं तशीच मनकवडी आहेस !

मस्तानी—पण आपण हें विसरलां कीं, आपल्या सौंदर्यापुढें मी अगो-दरच हार गेलेलें होतें ! हार गेलेल्या माणसापुढें आपण हार जायचं—छे: बाई ! ह्यांत आपलं लष्करी धोरण थोडंसं चुकलंच् !

निजाम०—कैसा नुकता निकाला.

बाजी०—अग, तुला पाह्यल्यावर घोरण चुकायचंच ! तुझ्यासारख्या मनरमणीला पाहून धोरण शिल्लक राह्यलं तर तो घोरणी सेनापतीच नव्हे !

पद २६ वें

बाला बघुनियां डोळां । ज्ञान घे रजा ॥ धृ० ॥ चित्त अधीर नराचें । बोले ऐसे शीघ्र जा जा ॥ धृ० ॥ भर भावनेला । जागा न मतिला । आनुभावि हृदय मजा ॥ १ ॥

निजाम०—( स्वगत ) कैसा उमदा नुक्ता ! कुदरतके इस नुकतेको, ज्यो खियालमें लायेगा वही फत्ते–ह–याब होगा.

मस्तानी—पण ह्या नाजूक भावना आपल्याला कशा मिळाल्या ? हें नाजूक रूप आपल्याला कसं लाभलं ? हा अप्रतिम देखणेपणा आपल्याला कुणापासनं आला ?

बाजी०—माझ्या आईपासनं !

मस्तानी—काय ? आपली आई इतकी का सुंदर होती ? सासूबाईचं रुप इतकं का देखणं होतं ?

बाजी०—( हंसून ) अग ' होतं ' काय ? आहेच ! माझ्या आईला मारून टाकायचा तुझा विचार आहे वाटतं ?

मस्तानी—( दचकून ) म्हणजे ? सासूबाई—

बाजी०—छेः, छेः, तुम्ही सुना ह्मणजे साऱ्या अशाच ! सासू म्हटलं कीं तुम्हांला डोळ्यांपुढें नको ! अग, माझी आई जिवन्त आहे––

मस्तानी––( हंसून ) हें कांहीं तरी ! म्हणे माझी आई जिवन्त आहे ! मला कांहीं माहीतच नाहीं वाटतं ! हें पहा, ह्या पुणेरी थापा माझ्यापुढें नाहीं चालायच्या !

बाजी०—मस्तानी, माझी आई खरोखरीच जिवन्त आहे—माझी महाराष्ट्रमाता जिवन्त आहे, माझ्या शरीरांत जर कांहीं सौन्दर्य असेल तर तें तिच्या कृपेचं फळ आहे ! स्वदेशभक्ति ही अशी एक अपूर्व शक्ति आहे कीं जिच्या योगानं माणसाचं कुरुपपण निघून जातं आणि त्याला

मदनाचं रूप प्राप्त होतं ! अग, स्वदेशभक्तिच्या आनन्दमय रंगाची डूब शरीराला दिली म्हणजे त्याला जो सुन्दरपणा येतो त्याला ह्या जगांत कुठें जोड मिळेल ? विश्वकर्म्यानं मयूर पक्षी उत्पन्न करतांना जो सौन्दर्य-मसाला जवळ ठेवला असेल त्यापेक्षांही सुन्दर रंगाचे कुंचले स्वदेशभक्त मनुष्या-करितां सृष्टि देवी घेऊन येत असते ! मस्तानी, ह्या कुंचल्याचा लोभ कोण धरणार नाहीं ? आणि ह्या कुंचल्याचा लोभ धरला तर ती प्रेमळ जननी मनुष्याला सौन्दर्य कां देणार नाहीं ?

निजा०—( स्वगत ) आज मैं इस नुक्तेके तैहलमें पोहोंच गया. और समझ गया के इस आल्–मे–फानीमें स्वदेशभक्ती यही खूबसुरती है. कैसाही खूबसुरत हो. मगर जिस दिल मे स्वदेशभक्तीकी बंनही वोह मूसियालह और सियाह फाम है.

मस्तानी--राव, मागं मी पदमकुवरजवळ एक उखाणा घेतलेला होता.

बाजी०—( हंसून ) असं का ?

मस्तानी--( हंसून ) मला ती उखाणा घेतल्याबांचून सोडीचना !

पद २७ वें

तव नाम खरोंचि घेतलें । मन जाहलें वेडें खुळें ॥ धृ० ॥
रुसलें पळालें मुखस्तम्भ झालें ! परी शेवटीं नको तेंचि आलें ॥१॥

बाजी०—( हंसून ) आणि आपल्यालाही पण ना हवाच असेल ! बरं पण आपण उखाणा काय घेतला होतात तो तर सांगा अगादर !

मस्ता०—" सासुबाईच्या आलें पोटीं—ज्यास्तव केले नवसा कोटि " असं मी त्या उखाण्यांत ह्मटलेलं होतं ! पण मला आतां तें अगदीं खरं वाटतंय् ।

बाजी०—( हंसून ) तें कसं काय बोवा !

मस्ता०—त्यावेळीं मला माहित नव्हतं कीं माझी खरी सासूबाई ही महाराष्ट्रभूमि आहे, आणि हिचं अतिशय पुण्य म्हणूनचं ह्या महाराष्ट्र भूमीच्या पोटीं आपल्यासारखं सुन्दर रत्न जन्माला आलं !

निजाम०—ये बात मुतलक न हक्क है! बाजीराव जैसे फर्जंद जिस सर जमीपर जाहेर होंगे, वहा फत्ते-ह-मंदी के ही नकोरे होंगे बलके, फिल हाल, इस जहांमे एक बाजी वरहन कुल पाजी!

बाजी०—आपल्याला आज कुणी भाटाची नोकरी दिलेली आहे वाटतं?

मस्तानी०—भाटाची नाहीं—पण भटाची बाळाजी विश्वनाथ भट ह्यांच्या जगद्विख्यात पुत्राची मात्र नोकरी मला दिलेली आहे!

बाजी०—छेः! आज तूं कोट्यांची अगदीं कमाल केलीस! आज कालीदास किंवा वामन पण्डित ह्यांचं वरदानच तुला मिळालेलं दिसतंय्! खरोखर काव्यरूपी गडाचा कुणी गडकरी जरी येथें येऊन उभा राहिला तरी तुझ्या कोट्यांच्या पुढें त्याची गाडी गडबडून जाईल.

मस्तानी—असला विषय पुढें असल्यावर कुणाला काव्य सुचायचं नाहीं? कवींचीं काव्यं भिकार होतात ह्याचं कारण, त्यांना विषय भिकार मिळतात! पण राष्ट्रांत पराक्रमी पुरुष निपजेल कीं काव्यच काव्य! राष्ट्राला काव्यमय करायचं असलं तर राष्ट्रांत पराक्रमावर पराक्रम आणि कर्तबगारीवर कर्तबगारी झळकली पाहिजे!

बाजी०—हें तुझं आणखी एक काव्य! मला वाटतं कीं आज तूं नवीन नवीन काव्यं रचणार आहेस! मग कर कर, पाहूं आणखी काव्य!

मस्तानी—(हंसून) होय करतें. पण आतां शब्दांचं काव्य करायचं नाहीं!

बाजी०—मग कसलं?

मस्तानी—कृतीचं!

बाजी०—काय? कृतीचं काव्य? तें कसं बोवा!

मस्तानी—(हंसून) हें असं!

[मस्तानी त्याचे मागून जाते व त्याचे तोण्डांत मक्याचे दाणे घालते]

हें असं! समजलं ना, हें असं! ह्या माझ्या कृष्णाच्या मुखांत ही नवीन मिराबाई ही अशी प्रेमाची मिठाई घालतें आणि धन्य होते.

पद २८ वें

प्रेमामिठाई । घालित बाई । पतिमुखिं नाजुक नारदा ॥ धृ० ॥
हृदयीं लाट उसळे । सुखसर सुखसरिं मिसळे । राधिकाहि यदुकुमार तूं । यदुकुमार । यदुकुमार ॥ १ ॥

( पडदा पडतो )

निजाम०— ( पुढें येऊन ) कैसा अजब नजारा नजर आया ! मेरा दिल बाग बाग होगया ! झ्युले झ्युलाये देहलीमे ताज्युब खेज मखलूक माई, मगर आज जो नजारा नजर आया कभी नजरसे नही गुजरा ! दादी जानने कहाथा वोह हक्क है उसने खेची हुई तसवीर बाजीरावकी हीं है. उस तसवीर का मुझे यकीन न था. लेकिन आब मालूम होगा के वोह तसवीर और किसीकी नहीं. आज मैं बाजीराव को न देखता तो ऐसाही समझता के एक आलीशान सलतनतकी बाडगेइना थामनेवाला पेशवा जम्मीपर न ठैरे और भुट्टा न खाए. हाररोज निजामतके नोश करनेवालो तक्कलुकी लिसाबमे रहनेवाला बाजीराव और उसके आका शाहुमहाराज मुला दिजा फरमाइये देखिये, ये कैसे सादगी पसंद हैं. हाक्क यही है के गरीबो की वाली गरीबही हो ! ज्यो गरीबोका नकद सर्फ करेगा वो गरीब परवर कैसा होगा है ! ये कोन ? यही वो बदमाष दौलतराव ! वोह खियाल करता है के उसकी बदमाषी हमे मालूम नहीं, जिसवख्त हमनें मुलाहिजा किया उसी वख्त उसको पेहेचान लिया है ये क्या कर रहा है ? इसके दिलमें क्या है ? खैर कुछभी हो उस्की सरकशीपर खूप खियाल और नजर रखना चाहिये.

[ नन्तर दौलतराव प्रवेश करतो ]

दौलत०—मी ह्मटलं नाहीं कीं उत्तरेकडे माझा भाग्योदय होणार ह्मणून ? अहो, बाजीरावाला उत्तरेकडे येऊन जर मस्तानी मिळाली तर आह्मी काय हातांत बांगड्या भरल्या आहेत होय ? [ पडद्यांत बांगड्यांचा आवाज ऐकूं येतो ] काय ? बांगड्या ह्मटल्याबरोबर बांगड्यांचा आवाज ?

काय हे माझं नशीब शिकन्दर ? ओ हो हो हो हो! अरे ही तर माशुक परी ? जणूं कांहीं बाजीरावाची मस्तानीच !

[ मस्तानी शिकारच्चिया वेषांत प्रवेश करते ]

मस्तानी—अगबाई, ते किती लाम्ब गेले ? ( कावरेबावरेपणानं इकडे तिकडे शोधते )

दौल०—( हंसून ) अरे ही कावरीबावरी दिसतीय् ! ही कुणाला तरी सोधतीय् खास !

मस्तानी०—तूं तिकडच्या बाजूला उभी रहा असं त्यांनीं मला सांगितलं आणि ते हरणाला अडवायला गेले ! त्या हरिणाची वाट बघत मी धनुष्य-बाण सरसावून किती वेळ तरी उभी आहे तरी अजून ते कसे येत नाहींत? हरणानं त्यांना फार लाम्ब नेलं कीं काय ? छेः बाई ! माझ्या जिवाला फार हुरहुर लागलीय् !

दौल०—अहाहा ! इच्या चेहेऱ्याकडे बघितलं ह्मणजे मी लोण्यासा-रखा विरघळून लोणच्याप्रमाणं माझ्या अंगाला पाझर फुटला !

मस्तानी०—अरे हा कोण इथें? तिकडचा निरोप घेऊन तर हा नाहीं आला ?

दौलत०—छेः ! इच्याशीं बोलल्याशिवाय नाहीं रहावत बोवा ! आतां हिनं आपण होऊन बोलायला सुरवात केली तर ठीक, नाहींतर भोप-ळ्याच्या वेलाप्रमाणें आपणच हिच्या पायांभोंवतीं गुण्डाळी मारली पाह्यजे !

मस्ता०—( स्वगत ) बोलूं का याच्याशीं ?

दौलत०—( स्वगत ) अरे, हिचे ओंठ हलायला लागले ! ही बोलणार आतां माझ्याशीं ! छेः, नुसत्या ह्या कल्पनेनं देखील माझ्या अंगावर फण-साप्रमाणं कांटा आलेला आहे !

मस्ता०—कांहो आपण कुठनं आलां ?

दौलत०—( स्वगत ) अरे, ही बोलली ! अरे ही माझ्याशीं बोलली ! खरोखर बोरांतली बी पुट्टादिशीं बाहेर पडावी त्याप्रमाणें माझा दिल बाहेर पडायच्या बेताला आलेला आहे !

मस्तानी०—आपण कुठनं आलां ?

दौलत०—( स्वगत ) मी कुठनं आलों हें काय सांगावं हिला ? छेः आपण तर अगदीं गोन्धळून गेलों बोवा ! ( उघड ) मी ना ? मी तिकडनं आलों !

मस्ता०—( आनंदानें ) काय तिकडनं आलां ? आपल्याला तिकडनं का धाडायचं झालं !

दौल०—( स्वगत ) हंसून ) अरे ! हें मेतकूट चांगलं जमत चाललेलं आहे ! देतों आतां कांहीं तरी थापा ! ( उघड ) हो हो, मला त्यांनींच पाठवलं !

मस्ता०—तिकडनं का पाठवायचं झालं आपल्याला ? स्वारी कितीशी लाम्ब झुकली ?

दौलत०—( स्वगत ) ही स्वारी कोण आणि ती कुणीकडे झुकली ह्यांतलं एक अवाक्षर मला माहीत नाहीं ! पण मी मात्र वाटेल तशा बाता झोंकतों आहें !

मस्ता०— गोविन्दपन्त कुठं आहेत ?

दौलत०—( स्वगत ) हा गोविन्दपन्त कोण ? हा बाजीरावाचा शागीर्द तर नव्हे ? ह्मणजे ही मस्तानीच कीं काय ? वाः ! वाः ! ही जर मस्तानीच असली तर माझ्या भाग्याला कमतरताच नाहीं ! झोंकतों आतां आणखी बाता ! ( उघड ) गोविन्दपन्त बाजीरावांच्या बरोबरच आहेत !

मता०—( आनन्दानें ) ते तिकडच्या बरोबरच आहेत ना ?

दौल० ( स्वगत आनन्दानें ) अरे हें तिकडचं जमलं ! खरोखर हीच मस्तानी ! आतां तिकडचंही जमणार आणि इकडचंही जमणार !

मस्तानी—मग तिकडनं आपल्याला कशाला पाठवायचं झालं ?

दौल०—आपल्याला बोलवायला ? ते तिकडे आपली अगदीं वाट बघताहेत !




निजाम०—प्यारी... बाजीराव०—(सन्तापानें) स्त्री जात तेवढी हरामखोर ! ( पान ७५. )

मस्तानी० —( आनन्दानें ) असं का ? मग चला तिकडे !

दौल०—( स्वगत ) नेतों आतां हिला करवन्दीच्या वनांत ! निजाम उल्मुल्कसाहेब तिथेंच असतील ! त्यांची कोणची तरी मोठी कामगिरी बजवायचं वचन दिलेलं आहे आणि तें वचन पूर्ण करायला ही उत्तम संधी आहे ! असलं रत्न स्वतः ठेवायचं सोडून दुसऱ्याला अर्पण करायचं ह्मणजे जिवावर येतं पण करायचं काय ? माझ्या आयुष्याच्या सुरवातीलाच मांजर आडवं गेल्यामुळें हें असं होतंय् ! चला, दौलतराव प्रसंग आला बाका आणि ह्या दौलतरावाच्या रिकाम्या खाका !

मस्तानी—( स्वगत ) माझा डोळा लवतो आहे ! काय बरं ह्याचं कारण ? पण कारण कसलं ? फार वेळ डोळाभर बघायला मिळालं नाहीं ह्मणूनच असेल !

दौल०—चला बाईसाहेब लवकर. ( दोघेही जातात )

( पदमकुंवारी प्रवेश करते. )

पद्म०—अहाहा ! ही माझी महाराष्ट्रभूमि—

पद २९ वें

अहा देश कैसा छान । माझं गेलं देहभान । हिरवं हिरवं सारं रान । कुठें नागवेली पान । कसा पिकला गहुं ग हरभरा । हा शाळु मक्याचा तुरा । नादि वाहे अधर । जरिचाचि पदर । ना ठरे नदर । महाराष्ट्र देवि सुन्दरा । सोनेरि गुडी मन्दिरा । सह्याद्रि रांग ही भली । रांगोळी जेंवि शोभली । ग भारी । अमराई पेरु जाम्भळी । कोकिळा राघु शोभली । हें मखर केळिचें कसें । किं मोहक दिसे । किं त्यामधिं बसे । कि मनमोहना । ही मनोहरा । सुखसारा ॥

अगबाई ! किती हे पोपट ! ह्या पेरूच्या झाडावर बसून त्यांनीं केवढं झांकर घातलं आहे ! पोपट–पोपट–बोलो गंगाराम–पोपट, पोपट—

( दौलतराव प्रवेश करता )

दौलत०—केली! मस्तानीला दुसऱ्याच्या स्वाधीन केली! पुन्हां शेवटीं मी आपला मोकळा तो—मोकळा! परमेश्वरा माझी कांहीं सोय करायची तुझ्या मनांत नाहींच का रे?

पद्म०—पोपट, पोपट—

दौलत०—काय पोपट, पोपट! अरे ही कोण मैना! बस्स आतां दौलतराव, लाट आहे तुझी!

पद्म०—पोपट, पोपट,—बोलो गंगाराम—मिठू मियां—मिठू मियां—

दौलत०—(स्वगत) आतां आपणच हिला पोपटासारखं उत्तर द्यावं! (उघड) मिठू मियां मिठू मियां—

पद्म०—अहाहा! काय हे बोलके पोपट इथले! मिठू मियां—मिठू मियां—

दौलत—(पुन्हां) मिठू मियां—मिठू मियां—

पद्म०—अगबाई! हा बोलका पोपट आहे तरी कुठें?

(इकडे तिकडे पहाते)

पोपट पंची चतुर सुजाण
पडो पार्वती श्री भगवान

(चुटक्या वाजवते)

[दौलतराव तसेंच ह्मणतो. पद्म आश्चर्यचकीत होते.]

पद्म०—कायबाई हें आश्चर्य! इतका बोलका पोपट मी कधीं पाह्यला नव्हता!

दौलत०—(पुढें होऊन) (हंसत) आपल्याला बोलका पोपट हवाय् वाटतं!

पद्म०—(हंसत) होय, कुठं आहे तो बोलका पोपट?

दौल०—हा इथें आहे.

पद्म०—कुठें? कुठें?

दौल०—हा पहा इथें ! ( ती पुढें जाते. ) हा पहा इथें ! ( आणखी पुढें जाते. ) हा पहा इथें ! ( आणखी पुढें जाते. ) ( तो तिला आंत घेऊन जातो. )

( पडद्यांत पद्म ओरडते—" चाण्डाळा, अशा रीतीनें मला फसवलंस का ? " )

( चमेली एका हातांत गोफण व एका हातांत ताट घेऊन येते )

चमेली—काय बाई करावं ? इकडे पांखरं राखावीं कीं इकडे हें ताट पोंचवावं ! पांखरं तरी थोडीं आहेत का ? माळ्यावर बसलं कीं सभोंवार अशीं पांखरं गोळा होताहेत कीं कांहीं पुसूं नये ! खरोखर ह्या पांखरांच्या अंगावर गोफण उडवायची ह्मणजे जिवावर येतं आणि ( हंसून ) मेला चमत्कार असा कीं एक गोफण उडवली कीं दुप्पट पांखरं गोळा होतात ! ( पडद्याकडे पाहून ) हें पहा, मी जरा ताट पोंचवून येतें तोंपर्यन्त हीं पांखरं राखा अं !

( आंत मोटेचा आवाज व बैल हांकल्याचें गाणें ऐकूं येतें. )

मोट राहूं द्या ह्मटलं ना ? नाहींतर इकडे शेताला पाणी देत बसाल आणि इकडे पांखरं सगळं शेत खाऊन टाकतील ! ( हंसून ) बाकी पांखरं राखायचं काम करावं आह्मीं बायकांनींच ! पुरुषांना कांहीं तें साधायचं नाहीं ! पुरुषांनीं फक्त मोटा हाणाव्या ! पुरुष न् मोटेचे बैल सारखेच ! ( जाते. )

[ पडदा उघडतो. मस्तानी शोकांत बसली आहे. ]

मस्तानी—( सुस्कारा टाकून ) त्या पाजी माणसानं मला काय फसवलंन् ! खरोखर ह्या जगांत एक फक्त माझा बाजीरायाच सच्चा ! बाकी—एक बाजी और सब पाजी ! पण आतां काय करावं ? इथनं माझी सुटका कशी होणार ? माझ्या प्राणवल्लभाकडे माझी बातमी कोण पोंचविणार ? अग बाई, पावलं कुणाचीं वाजताहेत ! अशोक वृक्षाखालीं बसलेल्या माझ्या सीतेला आपल्या नगरींत परत न्यायला जसा तो दाशरथि राम आला त्याप्रमाणं माझा दाशरथि रामच येत असेल का इथें !

[ पद्मकुंवारी प्रवेश करते. ]

मस्ता०—कोण ? पद्मकुंवारी ? माझी ताई ? आणि तूं इथें ? अग, तूं इथें कशी ? ( तिला मिठी मारते )

पद्म०—( तिच्या तोण्डावर हात ठेवून ) अग गप ! अग गप ! इथें आपण कैदेंत आहोंत, राजवाड्यांत नाहीं !

मस्ता०—अग, पण तूं इथें कशी ?

पद्म०—( तिच्या तोण्डावर हात ठेवून ) तूं पुन्हां बोलायला लाग-लीस ! अग, तुला तुरुंगाचे नियम माहीत नाहींत वाटतं !

मस्ता०—( हंसून ) काय, काय तें ?

पद्म०—( हंसून ) अग,

कम खाना गम खाना
जब कटे कैदखाना

मस्ता०— अग पण—

पद्म०—( पुन्हां तिच्या तोण्डावर हात ठेवून ) हें बघ, तुला मी पाठीमागनं सगळं सांगेन, पण तूर्त आपल्या संकटाकडे लक्ष्य दे ! हें पहा तूं जशी तुरुंगांत आहेस तशी मीही तुरुंगांतच आहें ! पण—पण—( हळु आवाजांत ) ही पहा बाई इकडे ताट घेऊन येत आहे ! आतां ही गळ्यांतली मोहनमाळ देतें तिला आणि करतें पुढची गंमत ! तूं अगदीं निर्धास्त रहा !

मस्तानी—ताई, पण—

पद्म०—तुला एकदां सांगितलं ना ?

कम खाना, गम खाना
जब कटे कैदखाना

( पडदा पडतो. बाहेर जंगलच्या पडद्यावर बाजीराव प्रवेश करतो. )

बाजी०—( स्वगत ) काय ? मस्तानी नाहींशी झाली ? किती नामु-ष्कीची ही गोष्ट ! आमच्या बायका नाहींशा व्हायला लागल्या म्हणजे

आमची काय अब्रू राह्यली ! हें कुणा नीच माणसाचं कृत्य असेल बरं ? त्याला असं वाटतं काय कीं हिन्दुस्थानांत आपल्या बायकांचं रक्षण करण्याइतकेही मर्द सध्यां कुणी राह्यलेले नाहींत ? पण त्यांनीं हें लक्ष्यांत ठेवलं पाह्यजे कीं सध्यां हिन्दुस्थानांत नवीन युग सुरू झालेलं आहे ! मर्दपणाच्या नवीन हिन्दुस्थानांत ह्या जुन्या माकडचेष्टा आतां चालायच्या नाहींत ! हिन्दुस्थानांतली नवीन प्रजा——तरुण पिढी——हिन्दुस्थानांतले जवानमर्द सध्यां इतके स्वाभिमानी बनलेले आहेत कीं, आपला देश——आपलं घर——व आपल्या बायका——ह्यांच्या अब्रूला ते कधींही धक्का लागूं देणार नाहींत ! ( जातो. )

[ नन्तर पडदा उघडतो व पदमकुंवारी पांखरें राखीत माळ्यावर उभी आहे असा देखावा दिसतो. ]

पद्म——हुई, हुई, हुई–अरे–हूर ! ( गोफण मारते. ) ( आनन्दानें ) हीं पांखरं कशीं भुर्रदिशी उडून गेलीं ! मनांतले तरंग आणि हीं पांखरं सारखींच ! भुर्रदिशी येतात आणि भुर्रदिशी उडून जातात ! ह्या माळ्यावर उभं राहून कण्टाळा आला बाई ! आतां जरा खालीं उतरून पाय मोकळे करावे ! ( खालीं उतरून ) काय तरी बाई चमत्कार ! ती मोहनमाळ गेली आणि ही गोफण हातीं आली ! पण ही गोफण मला फार आवडते ! त्या मोहनमाळेच्या वेळीं मी कैदेंत–पारतंत्र्यांत होतें–आतां ह्या गोफणीनं मला मोकळीक–स्वातंत्र्य दिलेलं आहे ! अहाहा ! स्वातंत्र्य ही किती गोड चीज आहे ! ह्या स्वातंत्र्याकरितां आह्मीं आपल्या सम्पत्तीवर पाणी सोडूं, मग मोहनमाळेची काय गोष्ट आहे ? अग बाई ! हीं पांखरं पुन्हां यायला लागलीं ! आतां पारम्ब्यांच्या झोंपाळ्यावर बसावं आणि तिथनं पांखरं हांकावीं. ( झोंपाळ्यावर बसून झोंके घेते. )

झुण् झुण् पांखरा पांखरा
न्या मज माहेरा, माहेरा
कमानि दरवाजा, दरवाजा
त्यावर जाऊन बसा जा बसा जा

पांखरांनो, पांखरांनो, बुन्देलखण्डांतल्या माझ्या माहेरीं जाल का आणि बाबांना सांगाल का कीं तुमची पदम खुशाल आहे! मस्तानीची काळजी करूं नका! मी आतां बाजीरावसाहेबांना गांठते आणि तिची मुक्तता करिवतें! चला, जाऊं या इथनं डोळा चुकवून बाजीरावसाहेबांच्या छावणीवर! ( पडद्याकडे पाहून ) अग बाई, हें इथनं घोडयावर बसून कोण चाललं आहे? बाजीरावसाहेबच! ( हंसून ) आतां असं करावं? त्यांच्यावरच एक गाणं ह्मणावं आणि त्यांचं इकडे लक्ष्य जातं का पहावं!

पद ३० वें.

प्रिय बाजिराय, ये धांवुन। वनिं राहुन। वाट तुझि पाहुन। गेला जिव काहुन॥ धृ०॥ करि हळहळ तळमळ तरुणी। जणुं लागतांचि शर हरिणी। कांहि झाला दोष मनिं नाणी॥ चाल॥ गुणिं झालें तुझ्या गुंग। मनिं प्रणयाचे रंग। झाले मनोरथ भंग। प्रिया ये ये। थकलें मी विरह हा साहुन॥ १॥

[ बाजीराव प्रवेश करतो. ]

बाजी०—( घोड्यावरून उतरून ) कोण? पाटलीणबाई, कोण तुह्मी?

पदम०—( डोक्यावर पदर ओढून ) अगबाई, धांवा धांवा! मी पांखरं राखीत असतां आमच्या शेतांत हा कोण शिरतो आहे पहा!

बाजी०—छेः छेः भिऊं नका! पाटलीणबाई, मी कुणी परका नाहीं!

पदम०—अगबाई! हा फारच लगट करायला लागला! धांवा, धांवा, घरधनी धांवा—छेः बाई कसंच कुणी नाहीं इथें? शाहूमहाराज आणि त्यांचा प्रधान बाजीराव ह्यांचं महाराष्ट्रांत राज्य असतां शेतकऱ्यांना त्रास द्यायला आणि बायकांना छळायला हा कोण येतोय्?

बाजी०—( हंसून ) ( स्वगत ) बस्स! जें काय ऐकायचं तें ऐकलं! शाहुमहाराजांविषयीं प्रेम आणि माझ्यावर विश्वास! बस्स! हें ऐकून कानांची तृप्ति झाली! ( उघड ) बाई घाबरूं नका!

पद्म०—चला, व्हा पाठीमागं ! पुढें याल तर तुह्मांला बाजीरावांपुढें घेऊन जाईन !

बाजी०—बाई, तुह्मी मला ओळखलं नाहींत ! मीच बाजीराव !

पद्म०—काय, आपणच बाजीराव ? मग महाराज, गुन्हा माफ करा !

बाजी०—छेः ! ह्यांत कसला गुन्हा ? तुमच्यासारख्या शेतकरणी पाह्यल्या ह्मणजे माझ्या महाराष्ट्राचा मला मोठा अभिमान वाटायला लागतो. बरं पण तुह्मी जें गाणं ह्मटलंत तें कशाकरितां ?

पद्म०—तें आपल्याकरितां ! अहो, आपली मस्तानी संकटांत पडलेली आहे ! तुह्मी तिची मुक्तता कराल ह्मणून ती तुमची वाट पहात आहे !

बाजी०—मस्तानी ? कुठें आहे, कुठें आहे ती ? पाटलीणबाई, तुह्मांला तिची माहिती असली तर सांगा मला ! मी तुह्मांला चांगलं बक्षिस देईन !

पद्म०—महाराज, बक्षीस ? बक्षिसाची गोष्ट कशाला ! आपण श्रीमंत माणसं ! आपलं काम झालं ह्मणजे आपण मला ओळखणार देखील नाहीं !

बाजी०—नाहीं, नाहीं, पाटलीणबाई, ह्या बाजीरावाच्याकडनं तरी हा असला कृतघ्नपणा व्हायचा नाहीं !

पद्म०—पण ही गोष्ट अगदीं खरी आहे ! मी आपल्या ओळखीची असूनही आपण मला ओळखलेलं नाहीं !

बाजी०—काय ? आपण माझ्या ओळखीच्या आहांत ?

पद्म०—खात्रीनं ! आठवा, आठवा, नीट आठवा !

बाजी०—छेः, मी इथें कधींहि आलेलें नाहीं ! आपल्याला कधीं पाह्यलेलं नाहीं !

पद्म०—महाराज, खोटं आहे! आपण मला उत्तम रीतीनं ओळखतां. आपणांसारख्या मोठ्या माणसानं गरीबाला अशा रीतीनं विसरणं चांगलं नाहीं!

बाजी०—नाहीं, आपण माझ्या ओळखीच्या नाहीं! अहो, सैन्यांतल्या प्रत्येक शिपायाला मी ओळखतों, मग मी आपल्यालाच विसरलों असं कसं होईल?

पद्म०—( पदर एकीकडे करून ) ( हंसून ) काय? पटली कां ओळख?

बाजी०—कोण? पद्मकुंवारी? आपण इकडे कशा? तुह्मीं मला खूपच चकवलंत! चला आमच्या छावणींत!

पद्म०—नाहीं, आपणच पहिल्यान्दा मस्तानीच्या मुक्ततेकरितां चला! ( त्यांच्या कानांत सर्व सांगते. ) तिथल्या तळघराचाही रस्ता माहीत करून घेतलेला आहे! आपले वाटेल तितके शिपाई घ्या आणि मस्तानीला सोडवायला चला! हें पहा तळघर!

[ तळघरांत प्रथम पद्मकुंवारी उतरते. पाठीमागून बाजीराव उतरतो. तो उतरतांना खूण करतो. त्याबरोबर त्याचे अनेक शिपाई त्याच्या पाठोपाठ तळघरांत उतरतात. ]

( त्यानन्तर निजामुल्मुल्क, गुलामकादर आणि दौलतराव प्रवेश करतात )

निजा०—मस्तानी कहां है?

दौल०—अन्दर है हुजूर!

निजा०—दरवाजा खोल दो! गुलामकादिर, उस्के हमरा चले जाव!

( जातो )

दौलत०—( प्रेक्षकांकडे पाहून ) आतां मला खूप बक्षीस मिळणार! मी उत्तरेकडे बायको मिळवायला आलों! पण बरं झालं कीं बायकोही मिळाली आणि पैसाही मिळाला! आतां एवढं खरं कीं मस्तानीच्या ऐवजीं ती दुसरी स्त्री पत्करावी लागली! पण कांहीं हरकत नाहीं! निजामाकडनं

बक्षीस मिळालं कीं हिला घेऊन धावडशी गांठणार आणि अन्तूभटजी पुढें ही नवी बायको घेऊन अस्सा मिरवणार ! ( जातो. गुलामकादर त्याचे मागून जातो. )

निजा०—( स्वगत ) ये बेवकूफ ऐसा समझता है कि हम् मुसलमान लोग औरतोंके ख्वाहीशमन्द हैं ! लेकेन् एकजी मुस्लिम ऐसा नहीं जो औरों की औरतोंको ले चले गा या ! मादरो हम शिराह की इज्जत बिगाडेगा ! खुदा दानाबिना है ! मस्तानीसे मेरी कोई गरज नहीं ! लेकिन् इस नालायक आझाका खियाल कैसा है और ये मस्तानी मुसलमींकी इज्जत रखती है या नहीं और बाजीरावसे दिलजोई कैसी है ये मुलाहिजा करना चाहिये !

दौल०—( प्रवेश करतो. ) चलिये हुजूर दरवाजा खोला है !

[ दोघे चालूं लागतात. निजामुल्मुल्क पुढें जातो. मागें दौलतराव राहातो. त्यास निजामाच्या बेगमची दासी हटकते. ]

बेगमची दासी—ए गधे–

दौल०—जी हां !

बे० दा०—ये लो ! ( त्यास मोहोर काढून देते. )

दौल०—( स्वगत ) चला हें मिळालं आणखी एक बक्षीस ! ह्या मला गाढव समजताहेत, पण बक्षीस देताहेत ! आणखी कुणी मला बक्षीस द्या हो ! मला गाढव ह्मणा, पण बक्षीस द्या !

बे० दा०—ऐ गधे—

दौल०—जी हां ! ( स्वगत ) अरेच्या ! पुन्हां मला बक्षीस देताहेत वाटतं ! प्रत्येक शिवीबरोबर मला एकेक मोहोर मिळणार कीं काय ?

बे० दा०—तूं क्या समझता है ?

दौल०—मैं ऐसा समझता हूं की इस गधेको आप् औरभी एक आश्रफी देंगे !

ब्रे० दा०---( हंसून ) ( पुन्हां एक मोहोर देऊन ) अब् मुझे ऐसी जगे बिठाव कि जहांसे मैं अन्दर देख सकूं गी !

दौलत०---आजाइये, आजाइये ! ( स्वगत ) माझ्या आईबापांनो, ह्या बाळाचं दौलत हें नांव तुह्मी कोणत्या मुहुर्तावर ठेवलंत ? ( जातात. )

[ मस्तानी प्रतिबन्धांत एकटी बसली आहे. ]

मस्तानी—( स्वगत ) पद्मकुंवारी अजून कां बरं नाहीं आली ? माझा प्राणसखा तिला भेटला नाहीं का ? माझ्यावरचं त्याचं प्रेम बदललं नाहीं ना ? मी बहाणा करून निघून गेलें असं तर नाहीं ना त्यांच्या मनांत आलं ? हाय हाय ! असं जर होईल तर खरोखर मला मरणच बरं वाटायला लागेल ! ( पावलें वाजतात. ) अग बाई, कुणाचीं तरी पावलं वाजताहेत ! आलाच वाटतं माझा हृदयवल्लभ !

( निजामुल्मुल्क प्रवेश करतो )

निजा०—मोहिब्बेमन्—( स्वगत ) इस उज्रख्वाहीसे इस जानपर कैसा सदमाह् गुजरता होगा ?

( इतक्यांत बाजीराव गुप्त वाटेनें येऊन पोंचतो )

बाजी०—( आपल्या लोकांना, हळू आवाजांत ) तुह्मी तिथेंच रहा ! मी शिटी वाजविली कीं आंत या ! ( स्वगत ) मला बघून माझ्या लाडकीला किती आनन्द होईल ! [ निजामाकडे बघून ) अरे, पण हा कोण? माझ्या प्रियेच्या एकान्तांत हा कोण ? अरे हा तर निजामउल्मुल्क ! काय ? हा हिच्या एकान्तांत ? पद्मकुंवारी फार चांगलं केलंस ! हें दृश्य दाखविण्याकरितां तूं मला इथं आणलंस काय ? वा ! तुझ्या प्रेमाची मागणी धिःकारल्याबद्दल फार चांगला सूड उगवलास ! ठीक आहे ! आतां तुझा, हिचा आणि ह्या हिच्या जाराचा खून पाडतों. तुमच्या बेइमानीबद्दल बक्षीस दिल्याशिवाय मी खरोखर राहाणार नाहीं ! ( खुनशीपणानें ) बोला, बोला, खुशाल प्रेमभाषणं बोला !

निजा०—प्यारी—

बाजी०—( सन्तापानें ) प्यारी अं !

मस्तानी—जिवलगा !

[ त्याचेकडे न बघतां एकदम त्याला मिठी मारायला येते. ]

बाजी०—( स्वगत ) स्त्रीजात तेवढी निमकहराम ! नुक्ती-नुक्ती ही मला अशीच मिठी मारायला येत होती—आणि आज माझ्या वैऱ्याला ती तितक्याच ह्यगयीनें मिठी मारायला जात आहे !

मस्तानी—कोण ! तुम्ही कोण ? मी अशी एकान्तांत असतां इथें येणारे तुह्मी कोण ?

निजाम—ए जानेमन, इस प्यारेको पैछानती नहीं ?

निजा०—आपका आका कौन ?

मस्ता०—मेरा मालिक बाजीराव ! शाहुराजका पेशवा बाजीराव मेरा मालिक है !

बाजी०—( पश्चात्तापानें ) हाय, हाय ! काय माझी चुकी ! किती विनाकारण मी माझ्या प्रियेला दोष दिला !

निजा०—( हंसून ) बाजीराव ? वो भटका लडका ?

मस्ता०—हां भटका लडका ! लेकिन् झटका देनेसे दुश्मनोंके दांत गिरानेवाला बाजीराव !

बाजी०—( स्वगत ) काय झटकेबाज उत्तर दिलंन् ?

निजा०—मस्तानी, सब कुछ् भूल जाव् ! अब् तुम् मेरे कब्जेमे हो ! बाजीरावका खियाल छोड दो

मस्तानी—नहीं, नहीं, हरगीज नहीं !

निजा०—मैं कहिता हूं कि अब तुम इस जानसे अलाहिदा नहीं हो सकती !

मस्तानी—कौन ? मुझको कौन रोकेगा ? आस्मान् और जमीन ये दोनोंपर ऐसा कौन है की जो मुझको रोक सकेगा ?

निजाम०—न छोडूंगा ! न जाने दूंगा ! तुझें मालूम हैं कि हम कौन हैं ?

**मस्तानी**—तूं कौन भी हो, लेकिन् मैं इतनाही जानती हूं कि वफादारीसे अपने खाविन्दपर प्यार करनेवाली औरतको इस दुनियामें कोईभी रोक नहीं सकता! वफादार औरतको रोकनेवाले सिर्फ दो—जमीं पे उसका मालिक और अस्मान्‌में दुनियाका मालिक!

**बाजी०**—वाः! वाः! तूं आज पतिव्रतांचीहि गुरु झालीस!

**निजा०**—मस्तानी, तुम मुसलमान हो–फिर हिंदुसे दिलजोई? नंगोनामूसका बाईस है!

**मस्तानी**—क्या सच्चाईनें चलनेमें इज्जत नहीं? वफादारीकी जिन्दगीमें इज्जत नहीं? ईमानमें शौहर पसन्द करनेमें इजत नहीं? भाई, मैं मुसलमीन हूं, इसी वजे मेरा दिलका खाविन्द मैंने चुनाया है! मुसलमीन औरत बेवफा कभी नहीं बनती! मुसलमीन औरत प्यारका बेपार कभी नहीं करती! मुसलमीन औरत शादीको तमाशा कभी नहीं समझती!

**निजा०**—इस जानको अपने बिरादरों में शुमार न करो. आप मेरी चन्द रोजमें पनकुहा बन जाएंगी!

**मस्ता०**—वो बात छोड दो! मैं जातकी मुसलमीन हूं! जो मेरा हाथ पकडेगा उसको मैं ठोकरसे उडाऊंगी!

**बाजी०**—मला बरोबर पत्नी शोभतेस!

**मस्तानी**—ख्याल रखना कि मैं मुसलमीन हूं! मैं रोनेवाली नहीं! छाती पीटनेवाली नहीं! किसीको डरनेवाली नहीं! मेरा हाथ पकडनेकी किसकी कीमत है? मेरा हाथ पकडनेकी किसकी हिम्मत है?

**पद ३१ वें.**

**लात मेरी खाव्। जल्दि जाव्। ऐसि न कर मुजोरी। बस्स् हुइ हुशियारी। जाव्॥ धृ०॥ प्यारा है मुझे खाविन्द मेरा। सुनेहरी सितारा है सहारा। जाव्॥ १॥**

**निजाम**—आपकी कोई आदा कारगर न होगी! ये निजामउल्मुल्क वालिये देहलीका सिपेह सालार है! समझा?

मस्तानी—तो गरीब परवर आप क्या कर रहे हैं ? आप जैसे शरीफोंका कितना ऊंचा दर्जा ! क्या उसको आप दाग लगाएंगे ? नहीं, नहीं ! खुदाके प्यारे, मजबके सितारे—ये काम छोड दीजिये ! ये कमीनोंका काम है—ये काम बदमाशोंका है की दूसरेकी औरतोंकी इज्जत ले ! सच्चा मुसलमान ऐसा कभी नहीं करेगा ! आपही ऐसा काम करेंगे तो गुन्हागारोंका बन्दोबस्त कौन करे गा ? उनको सजा कौन सुनाएगा ? नहीं, नहीं ! गरीबोंके पालनवाले—मैं एक ईमानदार औरत हूं ! मैं आपकी मोहोब्बत चाहती हूं ! मैं आपकी बेहेन हूं ! ( त्याच्यापुढें वांकते. )

निजाम०—( गादिवरून तरवार फेंकतो. ) आफरीं ! सद आफरीं ! मस्तानी, तुम हमशिराह हो ! सिर्फ तुमको अजमाना था ! हमें यकीन हो गया कि तुम बफादारोंसे हो ! तुह्मारी बाजीरावसे दिली मोहोब्बत है ! गर्ज, इस जहांमे एक बाजी और सब पाजी !

बाजी०—( पुढें होऊन ) निजामसाहेब, मैंभी कहता हूं कि इस दुनियामें बस्स्, एक निजाम और सब हजाम !

पदमकुंवारी—बेशक् ! बेशक !

निजाम०—कौन ? बाजीराव ? आप कहांसे आये ?

बाजी०—निजामजाहेब, हम मरेठे लोक पहाडोंके चुव्वे है ! किधरभी बैठेंगे, लेकिन् सब् देखेंगे !

मस्ता०—( कवटाळून ) ताई तूं कुठें ग होतीस ?

पदम०—( हंसून ) अग, तुझ्या बाजीरावाच्या जवळ ! ही सीता अशोकवनांत पडली तेव्हां हा राम व ही मी हनुमान् सीताशुद्धि करायला निघालों ! ( मस्तानी लाजते. )

बाजी०—( निजामास ) ह्या छत्रसाल महाराजांच्या कन्या पदमकुंवारी !

निजा०—तस्लीम, ताईसाहेबा, तसलीम !

पद्म०—( हंसून ) ( स्वगत ) मी आपली सगळ्यांची ताई बनून गेलेलें आहें. ह्या जगांत सर्वांच्या पदव्या बदलतील, पण माझी पदवी मात्र कधींही बदलायची नाहीं !

निजाम०—( टाळी पिटून ) गुलाम कादिर, किसी रक्कासाहको बुल्वा लाव !

बाजी०—( शिटी वाजवून ) गोविन्दपन्त—

[ तो गुप्त जागेंतून येतो. ]

निजाम०—( स्वगत ) बाजीरावने इस पोशिदाजाममें खास लोग रक्खे है ! मालूम नहीं ये कैसी होशियारी !

बाजी०—गोविन्दपन्त, आज मेजवानीचा बेत आपलेकडेच करावा ! आजच्यासारखे पाहुणे आपल्याला कधीं मिळायचे नाहीत !

पद ३२ वें.

समय आजिं सुन्दर बहु शोभत । जेंवि सुवर्णखनी करिं लाभत ॥ धृ० ॥ वाटे फुलला आज बगीचा ॥ थोर पुरुष करिती निज वाचा । अमृतघट खुला ॥ १ ॥

[ गोविन्दपन्त ' होय ' म्हणून निघून जातो. नाचणाऱ्या स्त्रिया वनदेवतांच्या पोशाखांत येतात व नाच करतात ]

अंक तिसरा समाप्त.

———

# अंक चवथा

## प्रवेश पहिला

[ कोकिळा मावशी पहांटेच्या प्रहरीं काकड आरतीला निघाल्या आहेत. ]

कोकिळा—( घराच्या बाहेर येऊन ) ताम्बडं फुटलंच वाटतं ! काय बाई उशिर झाला आज देवळांत जायला ! काल रात्रीच्या कथेचा परिणाम बरं हा ! काय पण आख्यान चांगलं लावलं होतं बोवांनीं. वेळ केव्हां गेला कांहीं समजलं नाहीं ! गेला तो पूर्वींचा काळ ! सीमन्तिनीचा नवरा नदींत बुडाला, तरी तो आपला तिला पुन्हां भेटला ! पण आतां सोळा सोमवार करा नाहींतर तीस तीन शनवार करा—एकदां माणूस गेलं तें गेलं ! तें पुन्हां म्हणून भेटायचं नाहीं ! कलियुग बरं हें कलियुग ! माझं हें असं झालं तेव्हांपासनं मी थोडे का उपास केले ! पण सीमन्तिनीच्या नवऱ्यासारखं तिकडनं कांहीं पुन्हां येणं झालं नाहीं ! खरोखर, हा जर पूर्वींचा काळ असता आणि तिकडनं येणं झालं असतं तर मी कपाळभर कुंकू लावलं असतं आणि विडा देतांना अशी लाजलें असतें कीं यंव ! ( मुरका मारते. )

विडा घ्याहो नारायणा
माझ्या लक्ष्मीजिवना
विडा देते कोकिळा ही
कांहो धरीयेलें मौना ? ॥ विडा० ॥

( तिला पतीची आठवण होते. ती अश्रु ढाळते. तितक्यांत देवळांतील चौघडा वाजायला लागतो. )

अगबाई ! हा चौघडा ! ( कर्णा एकूं येतो ) हा कर्णा ! आतां काकड आरतीला गेलंच पाह्यजे.

काकड आरती

देवा तुजला ओंवाळूं

रामा तुजला ओंवाळूं

सप्रेम पाउलें

तुमचीं हृदयिं कवळूं

रामा हृदयिं कवळूं

[ रुबी प्रवेश करते ]

रुबी०—काय ह्मणतां आहांत हें मावशी ?

कोकि०—अग, ही काकड आरती बरं !

रुबी०—काय ? काकड आरती ? काकड आरती ह्मणजे काय मावशी ?

कोकि०—तुमच्या लोकांत नसते का ग अशी काकड आरती ?

रुबी०—मावशी, आमच्या लोकांत प्रार्थना असते हो !

कोकि०—मला दाखीव बरं तुझी प्रार्थना !

रुबी०—मलाही तुमची काकड आरती शिकवा !

कोकि०—हं ह्मण !

काकड आरती

देवा तुजला ओंवाळूं ।

ह्मण ना ?

रुबी०—चला, त्या राईंत चौथऱ्यावर बसूं ! ह्मणजे कुणी बघायचं नाहीं !

कोकि०—बघेनात का मेले ! बाकी तुझंही ह्मणणं खरं आहे ! अग, मी आहे आपली अशी झालेली ! पण तूं चांगली न्हाती धुती ! तेव्हां कुणी तरी तुझ्यावर नजर ठेवल्यावांचून रहायचं नाहीं ! चल तिकडे !

( दोघी जातात )

( त्यांच्या पाठोपाठ सुलेमान प्रवेश करतो. )



मस्तानी०—हा आपला तरुण सरदार ! (पान ११९.)

सुले०—( रुबीकडे बघून ) अरे! ही कोण औरत? वाः! काय झणकाऱ्या मारतं आहे हिचं रूप! अन्तुभट ह्मणाले कीं देवळांत गेलं ह्मणजे बायकांच्याकडे बघायचं नाहीं! पण ही जागा देवळाच्या बाहेरची आहे! तेव्हां इथें हिच्याकडे टक लावून बघायला हरकत नाहीं! ( एकीकडे लपून राहातो. )

[ कोकिळा मावशी व रुबी आमराईत चौथऱ्यावर बसलेल्या आहेत. ]

रुबी—हूं! आतां यायला लागली थोडीशी काकड आरती! आपण आतां इथें रोज पहांटे येत जाऊं अं! आणि रोज मला तुमची काकड आरतीन् देवाचीं गाणीं शिकवीत जा!

सुले०—( बाहेर डोकावून ) ( आनन्दानें ) काय? रोज पहांटे ही इथें येणार? बस्स, क्या मजा है! ( जातो )

कोकिळा—अग, पण तुझी प्रार्थना नाहीं दाखिवलीस मला?

रुबी०—दाखिवतें हो! हं, चला अशा आंत! टेका गुडघे, मिटा डोळे—अन् ह्मणा—

[ पडदा पडतो. ह्यानन्तर पदमकुंवारी प्रवेश करते. ]

पद्म०—( स्वगत ) हा ब्रह्मेन्द्रस्वामींचा मठ ह्मणजे पवित्र भावनांचा ईश्वरी दरबार आहे! इथें सर्व पवित्रच पवित्र! इथली भूमि पवित्र! इथल्या लता पवित्र! इथले वारे पवित्र! इथला सर्व परिसर पवित्र! परिसरांत पाय ठेवल्यापासनं माझं मन कसं पवित्र होऊन गेलेलं आहे!

पद ३३ वें

( चाल—भयो सैंया, मैं मन० )

झालें बाई, मी अजि संन्यासी ॥ धृ० ॥ पवित्र हें मन झालें त्यजोनियां पाशा सुखांत गोडी न उरली विरे मनों आशा। प्रसन्न अन्तर नेई उदासता नाशा जगतांत देखत मोदें चराचरीं ईशा भ्रम गेला। माझा। भ्रम गेला। आश्रमिं सुखवासी ॥ १ ॥

( आनन्दानें ) अहाहा ! काय हा आनन्द ! आतां सर्व विश्वांत माझ्या मनाचा अंश भरून गेलेला आहे आणि मी विश्वमय बनलेलें आहें ! आतां माझ्याशिवाय ह्या विश्वांत कांहींएक उरलेलं नाहीं ! हा उदयाला येणारा तेजोगोल मी ! ही लाजाळू उषा मी ! हें आकाश मी ! ही भूमि मी ! हें उदक मी ! हा पर्वत मी ! ह्या विश्वांतील प्रत्येक वस्तु--प्रत्येक जीव--प्रत्येक प्राणी मी ! ह्यांचं सुख तेंच माझं सुख ! ह्यांचं दुःख तेंच माझं दुःख ! माझी आकुंचित सुखदुःखं विसरून विश्वाच्या सुखदुःखांत मी आतां किती तन्मय होऊन गेलेलें आहे ! ही तन्मयता हाच ब्रह्मानन्द हाच विश्वव्याप—हाच वैराग्याचा कळस !

[ ब्रह्मेन्द्रस्वामी प्रवेश करतात. ]

ब्रह्मेन्द्र०—नाहीं बेटा—वैराग्याचा कळस तुला अजून लाभलेला नाहीं ! हा घट अजून कच्चा आहे !

पद्म०--( नम्रपणानें ) काय ? अजून माझा विश्वप्रकाश अपुरा आहे ?

ब्रह्मेन्द्र०—होय बेटा, अजून तो अपुरा आहे ! पद्म, वैराग्याच्या बन्दराकडे संसाराच्या खाडींतनच जावं लागतं !

पद्म०--पण महाराज, संसाराच्या आरशाला तडा गेला ह्मणून तर मी वैराग्याच्या आनन्दांत शिरलें !

ब्रह्मेन्द्र०—आणि ह्मणूनच बेटा, तुझं वैराग्य कच्चं आहे ! अजून तूं वैराग्याला लायक झालेली नाहींस ! संसार बिघडल्यामुळें वैराग्यांत शिरलेले लोक हे खरे वैरागी नव्हेत ! बेटा, संसाराची परीक्षा तुला द्यायची आहे !

पद्म०—( निश्वास सोडून ) पण महाराज, मी संसाराची परीक्षा कुठनं देणार ? प्रियकरानं त्याग केला—प्रेम भंगलं—सौख्याच्या रंगावर पाणी साण्डलं—

ब्रह्मेन्द्र०—होय, होय—आणि ह्मणूनच बेटा, संसाराच्या रंगांत तुला रंगलं पाह्यजे ! संसार रंगदार असला ह्मणजे कुणीहि संसार करील—पण संसाराचा रंग बिघडून गेला—प्रेमांतला मनाचा जोडीदार लाभला नाहीं—

अपत्यांच्या मलिन अंगांनीं शरीर चुरडून न निघाल्यामुळें शरीराची शिवशिव कायम राह्यली—आनन्दाचा दिवा विझला—आपले अश्रु आपल्या हातांनीं पुसावे लागले—ते पुसायला कुणाचाही प्रेमाचा पदर पुढें येईनासा झाला ह्मणजे अशा वेळीं जो संसार करून दाखवितो तोच संसाराच्या कसोटीला उतरतो. बेटा, सुखाचा संसार करून दाखवला तर त्यांत काय कौशल्य आहे ?

पद्म०—पण महाराज, हा संसार कसा करायचा ?

ब्रह्मेन्द्र०—अग, हें फारच सोपं आहे ! त्याला फक्त मन मोठं करावं लागतं ! आपलं घर मोडलं ह्मणजे प्रत्येक घर हें आपलं घर—आपला आनन्द सरला ह्मणजे प्रत्येक व्यक्तीचा आनन्द तो आपला आनन्द—बेटा, स्वतःला अपत्य असलं नसलं तरी प्रत्येक मूल तें आपलं मूल—ह्या भावनेनं चाललं आणि वर्तनांत तसं करून दाखिवलं ह्मणजे माणूस संसाराच्या कसो-टीला उतरलं ! बेटा, जा, जा, असा संसार करून दाखवून मग वैराग्यांत शीर ! संसार मोडल्यामुळें कुळ्या मनानं वैराग्यांत शिरू नको !

पद्म०—काय, मी पुन्हां संसारांत जाऊं ?

ब्रह्मेन्द्र०—अग, पुन्हां काय ह्मणतेस ? तुझा संसार अजून झालेलाच नाहीं ! जा, जा, मोडक्या संसारांत शिरून तो धडका करून दाखीव ! अधु-या संसारांत शिरून तो पुरा करून घे !

पद्म०—तो कसा पुरा करायचा गुरुराज ?

ब्रह्मेन्द्र०—अग, महाराष्ट्रांत जा आणि महाराष्ट्रांतलं प्रत्येक घर कसं सुखी होईल ह्या विचाराला लाग ! अनाथ स्त्रियांचीं दुःखं नाहींशीं कर ! महाराष्ट्रांतले दीनदुबळे कसे समर्थ होतील हें शोधून काढ ! जुलमी लो-कांच्या जुलमाला टक्कर दे ! शेतकऱ्यांच्या मानेवरचं जूं ढिलं कर ! लोकांत तेज चमकूं दे ! तरुण पिढी सशक्त, गुटगुटीत, स्वाभिमानी आणि शहाणी निपजण्यासारखं शिक्षण दे ! बेटा—श्री समर्थांचं वाक्य लक्षांत ठेव कीं,

जें जें कांहीं आपणांसि ठावें
तें तें हळू हळू शिकवावें
शहाणे–समर्थ–स्वतंत्र करावें
सकल जनां

पद्म०—( उत्सुकतेनें ) महाराज, शैथिल्य माझ्या अंगांतनं गेलं! मला नवीन हुशारी वाटायला लागली!

ब्रह्मेन्द्र०—बेटा, वैराग्य हें पंगू नाहींच! वैराग्याच्या एके बाजूला प्रेम, वात्सल्य आणि शान्ति असते आणि दुसऱ्या बाजूला रक्ताचा सळसळाट आणि प्रयत्नांचा गडबडाट असतो! पण अज्ञानी लोकांनीं संसारतापाला वैराग्याची जननी मानून त्याचा भलताच अर्थ करून ठेवलेला आहे! बेटा, वैराग्य ह्मणजे संसाराची पूर्तता! हा संसार प्रथम कुटुम्बाच्या तळघरांत राहून मग राष्ट्राच्या सजावर चढतो आणि तिथनं वैराग्याच्या कळसावर आरोहण करून मानवी उन्नतीचा कळस करतो!

पद्म०—धन्य, धन्य! महाराज, आपल्या उपदेशानं मी धन्य झालें!

ब्रह्मेन्द्र०—बेटा, माझा शिष्य बाजीराव ह्यालाच आजपर्यन्त हें तत्त्व कळलं! आणि ह्मणून अनेक कष्ट सोसून राष्ट्रसंसाराचं ओझं त्यानं आपल्या अंगावर घेतलंय्! पद्म, रानांत राहून ‘राम’ ‘राम’ करणं सोपं आहे पण जगांत राहून राष्ट्रांतील सामान्य लोकांच्या अंगांत राम उत्पन्न करणं फार कठीण आहे!

पद्म०—गुरुमहाराज, मी निघालें! वैराग्याची पूर्तता करण्याकरितां राष्ट्रसंसार करायला मी निघालें!

ब्रह्मेन्द्र०—बेटा, माझा तुला आशिर्वाद असो!

[ पदमकुंवर ब्रह्मेन्द्रस्वामींना वन्दन करते. गोविन्दपन्त प्रवेश करतो. ]

गोविन्द०—महाराज मस्तानी बाईसाहेबांच्या सांगण्यावरनं बाजीराव साहेबांनीं ताईसाहेबांकरितां पालखी पाठविली आहे!

ब्रह्मेन्द्र०—वाः ! हा शुभशकुनच झाला ! बेटा, महाराष्ट्रांतलीं दोन देशभक्त माणसं जर एका विचारानं काम करतील तर ह्या महाराष्ट्रावर दुर्दैवाचे ढग कधींही येणार नाहींत ? ( जातात )

---

## अंक चवथा

### प्रवेश दुसरा

( रुबी पतीच्या भेटीसाठीं विव्हल होऊन गाणें गात आहे, इतक्यांत कोकिळा मावशी प्रवेश करतात )

कोकिळा—मला किनी तुझी प्रार्थना फार आवडली !

रुबी—आणि मलाही तुमची काकड आरती फार आवडली ! चला, ह्मणतां का ती पुन्हां ?

कोकि०—अग हो, देवाचं नांव किनी जितक्यान्दा घ्यावं तितकं थोडंच आहे ! ह्मण ह्मण पाहूं !

[ दोघी ह्मणतात ]

दोघी—

काकड आरती
देवा तुजला ओवाळूं
रामा तुजला ओवाळूं
सप्रेमें पाउलें
तुमची हृदयिं कवळूं
रामा हृदयिं कवळूं

कोकिळा—ह्या पहांटेच्या प्रहरीं हीं गाणीं फार चांगलीं लागतात नाहीं ?

रुबी—होय मावशी, पहांटेची वेळच अशी असते कीं त्यावेळीं सगळे वाईट विचार नाहींसे होतात आणि मन मोठं पवित्र होतं !

कोकिळा—अग रम्भी—

रुबी—मावशी, अग, रम्भी काय ह्मणतां ? माझं नांव रुबी !

कोकिळा—रुबी कीं ह्बी ? मला नाहीं येत बाई तें तुझं येस फ्येस् ! तें तुझ्याजवळच असूं दे ! मी आपलं तुला रम्भीच ह्मणणार ! वाटलं तर रम्भाताई ह्मणेन !

रुबी—( हंसून ) बरं, रम्भाताई ह्मणा ! मग तर झालं !

कोकिळा—इश्श् ! रम्भाताई, सगळंच मुसळ केरांत !

रुबी—ह्मणजे ? काय चुकलं मावशी ?

कोकिळा—अग, देवाला फुलं घ्यायचीं विसरलें ! चल, येतेस का ? तोडूं चार फुलं !

रुबी—चला, चला !

कोकिळा—अग, तें तुझं पांघरायचं राहूं दे ह्या पारावर ! मी आपली चौघडीही ठेवतें इथें ! ही सम्बळी—हें गवाळं—हें देखील ठेवतें इथेंच !

रुबी—( हंसून ) खरंच, कोण आलंय् इथें चोर !

कोकिळा—अग्ग् रम्भाताई, चोर तरी इतक्या लवकर उठताहेत कशाला ? चोर ह्मटले ह्मणजे आपले रात्रीं जागायचे न् उशीरां उठायचे ! चोर पहांटे कध्धीं उठायचे नाहींत !

रुबी—बरं ठेवतें हें इथें पांघरायचं बाजूला अं !

कोकिळा—मीही ठेवतें ही अश्शी इथें ! चल आतां !

[ दोघी जातात. दौलतराव प्रवेश करतो. ]

दौल०—( स्वगत ) जसा उत्तरेकडे गेलों तसा परत आलों ! आतां ह्या पहांटेच्या प्रहरीं ह्या पारावर जरा निजावं तरी ! फार थण्डी वाजते बोवा !

[ खालीं पडायला लागणार इतक्यांत कोकिळा मावशी त्याला दिसते. ]

दौलत०—( घाबरून ) हें कोण ? ह्या अन्धारांत हें कोण ? भूत—भूत—भूत !

कोकिळा—( हंसत ) माझी तुळशीची माळ राहिली हो !

[ येते आणि तुळशीची माळ घेऊन जाते. ]

दौलत०—( खूप हंसतो ) अरे ! ह्या तर कोकिळा मावशी ! अरे वाः ! आपल्या गांवची एकएक रत्नं चमकायला लागली ! पण ही कसली चमकतीय् ! मी मात्र भीतीनं इतका चमकलों कीं कांहीं बोलायची सोय नाहीं ! मला वाटलं कीं भूतच ! अन् खरोखर, इतक्या रात्रीं ही काय अशी भुतासारखी उठली आहे ? ( खालीं बसून ) आतां मात्र मी निजणार आणि प्रत्यक्ष भूत येऊन जरी मानगुटीवर बसलं तरी जागेवरनं हालणार नाहीं ! काय करावं ? आणखी कांहीं पांघरायला हवं होतं ! अरे, पण हें काय आहे इथें ? ( चौघडी घेऊन ) ही तर कोकिळा मावशीची चौघडी ! चला, चौघडी तर चौघडी ! अन्धारांत इतका वेळ दिसलीच नाहीं ! हा दौलतराव एक चौघडी घेऊन पारावर निजला आहे असं जर कुणीं बघितलं तर माझ्या कीर्तीचा चौघडाच वाजेल.

[ सुलेमान प्रवेश करतो. ]

सुले०—आज जरा आपल्याला यायला देरी झाली ! अरे, पण ती माझी प्यारी कुठें आहे ? ओहो हो हो हो ! इथेंच निजली आहे वाटतं ती ! त्या मावशीची वाट बघून बघून तिचा डोळा लागला आहे कीं काय इथें ? बरं झालं कीं ती इथें एकटी सांपडली आहे ! प्यारी—प्यारी— ( दौलतरावाच्या अंगावरून हात फिरवितो. )

दौलत०— प्यारी ? ही कुणाची स्वारी ?

सुले०—प्यारी, प्यारी !

[ दौलतराव अंग हालवितो. )

सुले०—अरे ! ही चमक्या मारायला लागली ! ह्या अन्धारांत देखील ही इतक्या चमक्या मारायला लागलेली आहे कीं क्या कहूं यार ?

दौल०—हें कुणी भूतबीत तर नव्हे ? पण आतां अगदीं निश्चय कीं प्रत्यक्ष भूत येऊन जरी इथं माझा गळा दाबायला लागलं तरी मरस्तपर्यन्त इथनं उठायचं ह्मणून नाहीं ! मेल्यावर पाहूं मग उठायची गोष्ट !

सुले०—अरे! ही किती खूबसुरत आहे? हिचे पाय डोल्यांतल्या धंजाप्रमाणें दिसताहेत!

दौल०—( स्वगत ) अरे! मी बराच सुन्दर आहे कीं!

सुले०—हिचे हात पितळेच्या पळ्याप्रमाणें दिसत हेत!

दौल०—( स्वगत ) काय पळा? हो पंक्तींत वाढायला पळा नको का?

सुले०—हिनं पांघरूण घेतल्यामुळें हिचे केस अजून दिसले नाहींत; पण ते खात्रीनं घोड्याच्या शेपटीप्रमाणं लाम्ब असतील!

दौल०—( स्वगत ) बरं झालं! गाढवाच्या शेपटीप्रमाणं नाहीं ह्मणाला! मेहेरबानी झाली बोवा!

सुले०—छेः! हिचं तोण्ड पाह्यल्याशिवाय नाहींच राहावत! काढतोंच आतां हिचा बुरखा!

दौल—छेः! हा कांहीं मला स्वस्थ निजूं देत नाहीं! ह्मटलं ह्या पहांटेच्या वेळीं भूतसुद्धां इथें यायचं नाहीं! पण हा लेकाचा कुठनं उगवला इथें? अलीकडची माणसं अगदीं भुतासारखीं रात्रीं वावरायला लागलेलीं आहेत बोवा!

सुले०—प्यारी—

दौल—( उठून ) मेरे प्यारे—मेरे दिल्के प्यारे—( त्याच्या गळ्यांत पडतो )

सुले०—अरे! हा तर पुरुष! हा दौलतराव!

दौल०—छेः! दौलतराव कसला? मेरे प्यारे—मेरे दिल्के प्यारे!

सुले०—अहो दौलतराव, तुह्मीं मेलां होतां ना?

दौल०—अहो, मेलों नव्हतों! गेलों होतों!

सुले०—कुठें गेलां होतां?

दौल०—गेलों होतों मष्णांत!

सुले०—अहो, मग ह्यालाच मरणं ह्मणतात! तुह्मीं मेलां असं समजून तुमच्या घरच्या माणसांनीं तुमचे दिवसही घातले!

दौल०--पण आतां आलों आहे ना? आतां बारसं करा ह्मणावं! बोलवा अन्तुभटजींना!

सुले०—अहो, तें असूं द्या! मी इथें कां आलों समजलं कां?

दौल०—कां बरं?

सुले०—अहो, इथें अगदीं पहांटे दोन बायका येत असतात!

दौल०—दोन बायका? काय ह्मणतां? चला, चला, शोधूं त्यांना!

सुले०—अहो, त्यांतली एक तुह्मीं घ्या—एक मी घेईन!

दौल०—तें पाहूं सावकाश! पहिल्यान्दा बायका तर शोधूं!

[ दोघे दोन वाटांनीं जातात. ]

सुले०—( जातां जातां ) ती खूबसुरत औरत ठेवूं आपण—आणि ती ( अंगावर शहारे आल्यासारखें दाखवून ) कोकिळा मावशी देऊं ह्याला ( जातो. )

( रोशन बिब्बी प्रवेश करते. )

रोश०—( गात गात )

" पिया बिन नहिं आवत चैन "

कहां देखूं? मेरे खाविन्दको कहां देखूं? घरमें नीन्द नहीं आई इस्के वास्ते मैं इधर आई!

पद ३४ वें

( चाल—बनमे जात ना सखी. )

घरमें निन्द न आगई। घरमें० घब्रर गई। इधर आई। घरमें० ॥ धृ० ॥ खाविन्द तो कहिं न मिला। जी मेरा छोड चला। बुलावुं खुलावुं किस्कु भला। आगइ ये कैसि बला?। आखी। रात मुझे। निन्द न० ॥ १ ॥

थक् गई! मैं थक गई! जाडाभी बहुत लगता हैं! यहां जरा बैठूंगा और मेरे प्यारेका गाना गाऊंगी! ऍं? ये क्या? ये किस्का ओढना? कोई औरतकाही दिखता हैं! लेंगे थोडा वख्त!

[ रुबीची ओढणी अंगावर घते, व ' पिया बिन नहिं आवत चैन ' असें ह्मणतां ह्मणतां पेंगायला लागते. [ दौलतराव प्रवेश करतो. ]

दौल०—( हंसून ) अरेच्या ! सांपडली रे सांपडली ! ही इथें येऊन निजली आहे का ?

[ तिचे अंगावर हात टाकतो. ती दचकून उठते व उभी राहाते. ]

रोशन—ऐं ये कौन ? ( जोरानें ) तूं कौन हैं ?

दौल०—अरे ! ही तर त्या दिवशींची परी !

रोश०—निकल जाव जल्दी ! नहीं तो, तूं जुता खाय गा !

दौल०—( स्वगत ) बस्स, आतां तेवढा संस्कार काय तो राह्यलेले आहे !

रोशन—( स्वगत ) मेरा खाविन्द यहा राहिता तो इन् लोगोंकी क्या बिशाद होती ? क्या ? पुकारूं उस्को ? होगा वो यहां ? खुदा करें गा मुझपर मेहेर ? ( उघड ) खाविन्द, खाविन्द—

सुले०—( प्रवेश करून ) ( स्वगत ) अरे ! ये तो मेरी बीवीकी अवाज ! मेरी बीवी कहां है ?

रोश०—खाविन्द ! खाविन्द !

दौल०—( तिचा हात धरून ) आज तुझा खाविन्द मीच ! चलो अब मेरे साथ !

रोश०—( पायांतल्या जोड्याकडे बोट दाखवून )

### पद ३५ वें.

( चाल—अग बाग वाग )

आजि खाव जूता।

सुले०—ये आया कहांका जी कुत्ता ? ॥ धृ० ॥

दौल०—यार, तेरा हुं मैं।

सुले०—हम जानते नहीं।

दौल०—बीवि, तेरा हुं मैं।

रोश०—हम मानते नहीं ।
दौल०—मिय्यां तेरा हुं मैं ।
सुले०—हम् सुनते नहीं ।
रोश०—आभखाव खाव जूता ।
सुले०—ये आया कहांका जि कुत्ता ॥ १ ॥

[ आंत जातात. ]

---

## अंक चवथा

### प्रवेश ३ रा

[ पडद्यांत तोफेचा धाडधाड् आवाज होत आहे. शनिवार वाड्यांतील आपल्या महालांत काशीबाई प्रवेश करते. ]

काशीबाई—कसल्या तोफा बरं ह्या ? कांहींतरी आनन्दाची बातमी दिसतीय् ! ( चपापून ) पण आनन्दाची कीं दुःखाची ? मला आलेला संशय तर खरा नाहीं ? त्या मस्तानीला—

[ मंजिरी प्रवेश करते. ]

मंजिरी—मुलगा झाला बाईसाहेब !

काशी०—( कपाळाला आंठ्या घालून ) काय म्हणालीस ?

मंजि०—( हंसत ) बाईसाहेब, मस्तानी बाईसाहेबांना मुलगा झाला !

काशी०—( उसने हंसें आणून ) तुझ्या तोण्डांत साखर पडो !

[ पद्मकुंवारी प्रवेश करते. ]

पद्म०—( हंसत ) साखर आणली आहे !

काशी०—काय ! मुलगा झाला वाटतं ! ( काशीबाईचें तोण्ड उतरतें ) बरं झालं बाई !

पद्म०—ही साखर घ्यायची होती !

काशी०—( उसने हंसून ) खरंच ! मेलं साखरेचं विसरलेंच होतें मी !

पद्म०—( स्वगत ) ह्या वेळीं साखर किती कडू झाली असेल पण !

काशी०—मंजिरी, आज काय उकडतंय ग? खिडक्या बन्द कां ठेवल्या आहेस ?

पद्म०—( स्वगत ) खिडकीतनं कुठनं यायला वारं ? प्रियकराच्या प्रेमाला खिडकी पडली कीं कुठनंच वारं यायचं नाहीं !

पद ३६ वें

( चाल–हायकेसाबे रहेम आब )

**बन्द झाली दार खिडकी ये न वारा कोठला वल्लभाच्या प्रेमगेहा मार्ग जेव्हां फूटला ॥ ध्रृ० ॥ डंखितो अंगासि पंखा दाहि बकुळी मोगरा शीघ्र पावे ऊर घडकी बन्ध त्याचा सूटला ॥ १ ॥**

पद्म०—( हंसत ) ( स्वगत ) सवतीमत्सर हा रोगच असा आहे ! ह्याच्या योगानं पित्त चढतं, पोटांत वायगोळा उठतो, डोळ्याला कावीळ होते आणि सारं जग पिंवळं दिसायला लागतं ! सवतीमत्सरासारखा दुर्धर रोग दुसरा नसेलच !

पद ३७ वें

( चाल—जलदी चलो सिया )

**न तुला जगीं सवतिच्या खर मत्सराला । उपमा नच सवतिच्या खर मत्सराला ॥ ध्रृ० ॥ तिजलागी सौख्य नाहिं । चैन कांहीं तिज ना बाई । द्वेषपूर्ण बाणे हृदया । पापपुण्य नेणें कांहीं । ये विचार काळा ॥ १ ॥ न तुला० ॥ नेत्रीं शरातें । वदनिं तें विषही राही । वक्रता कपोला । त्वरित शोष ये मुखाला । तेंवी । शूल ये कपाळा ॥ २ ॥ न तुला०**

काशी०—सकाळपासनं डोळ्यांपुढं कसं चक्कर येतंय् !

पद्म०—( स्वगत ) चक्कर यायचंच ! फेफरं आलं नाहीं हेंच विशेष ! ( उघड ) काय, सकाळपासनं चक्कर येतंय म्हणालांत ? मग एक औषध सांगूं का ?

काशी०—हो सांगा बरं !

पद्म०—ही साखर खा ! म्हणजे चक्कर बिक्कर सगळी जाईल !

काशी०—होय, साखर विसरलीच कीं!

पद्म०—ही साखर नकाच विसरूं! ती फार औषधी आहे!

काशी०—साखर मी कशी विसरेन? बाकी साखरेनं पित्तबित्त तर नाहीं ना वाढायचं?

पद्म०—(हंसून) साखरेनं पित्त? अहो, साखर तर फार पित्त-शामक! ह्या जगांत पित्तशामक औषधं दोनच! एक साखर—

काशी०—आणि दुसरं?

पद्म०—आणि दुसरं, लहान बालकाचा गोड पापा! हा गोड पापा घेतला कीं वाटेल तसलं पित्त उतरतं!

पद ३८ वें

(चाल–लाजूनि उभि तूं कां)

**घेतांचि अहा पापा। दुखणें हटे अपापा॥ धृ०॥ रामबाण हा जगिं काढा। नाशि सर्व जगतीं तापा। व्याधी न हटे तेव्हा। सकलांसि मार्ग सोपा॥ १॥ स्थल न कांहिं उरलें रोगा। व्याधि जाति साऱ्या लोपा। स्थान ना विलापा॥ २॥**

काशी०—(हंसून) खूप गमतीदार औषधं काढलींत गडे!

पद्म०—(हंसून) अहो, गमतीदार रोगावर गमतीदारच औषधं पाहिजेत! जसा रोग गमतीदार तसं औषधही गमतीदार! आणि म्हणून म्हणतें कीं खा ही साखर!

काशी०—काय, खाऊं म्हणतां?

पद्म०—(हंसून) हो, हो, अगदीं खरंच!

काशी०—काय, खाऊंच?

पद्म०—(हंसून) हो, हो, अगदीं खाच!

[नानासाहेब धांवत धांवत येतो.]

नाना०—आई, मी घालतों तुझ्या तोंडांत साखर!

पद्म०---( हंसत ) हं घाला, घाला पाहूं !

[ नानासाहेब काशीबाईच्या तोण्डांत साखर घालतो ]

पद्म०---आतां दुसरं औषध राह्यलं ! बाळाचा पापा घ्यायला आतां केव्हां याल ?

काशी०---येईन अंमळशानं !

पद्म०---अगत्य यायचं अं !

काशी०---अगत्य येईन बरं !

पद्म०---बरं मी येतें आतां ! ( स्वगत ) त्या खास येणार नाहींत ! माणूस जोरानं होकार द्यायला लागलं ह्मणजे त्याचा खास नकार !

**पद ३९ वें.**

( चाल---रमणी ये भोली भोली )

**नव रीती जगीं या कैसी । जडे मानवां ॥ धृ० ॥ ' होय ' ह्मणत तो ज्या ज्या काळीं तो ' नकार ' व्हावा ॥ १ ॥ मूक वसतसें तेव्हां चित्तीं क्षोभही उठावा ॥ २ ॥ नेत्र मिटुनि कामी जीवें भेटिलाभ घ्यावा ॥ ३ ॥**

पण ह्यांना यायला लावलं पाह्यजे. शनवारवाड्यांत जर सवतीमत्सराची आग भडकली तर साऱ्या महाराष्ट्रांत त्याच्या ज्वाला फैलावतील !

( जाते )

नाना०---आई, मीं जातों अं माझा नवीन भाऊ बघायला !

काशी० - जा, खुशाल जा !

( नानासाहेब " आह्मी जातों अं बाळ बघायला " असें ह्मणून निघून जातो )

काशी०---मंजिरी, माझा बिछाना घाल बरं ! काय बाई डोकं चढलंय् !

मंजिरी---( हंसून ) चला बाईसाहेब ! ( स्वगत ) सवतीला मूल झालं कीं बायकांचं डोकें चढलंच !

( बाजीराव प्रवेश करतो )

**बाजी०**—मस्तानीला मुलगा झालेला ऐकून हिला आनन्द झाला असेल का ? कीं ही खिन्नपणानं बसली असेल ? दोघींवरही माझं प्रेम असतां दोघी बायका केल्यापासनं माझा आनन्द दुप्पट होण्याचे ऐवजीं निमपटच झालेला आहे दोन बायका करणारांनीं माझं उदाहरण लक्ष्यांत ठेवावं ! म्हणजे आयुष्यांतली असली घोडचूक ते कधींही करणार नाहींत ! सध्यां माझं घर इतकं बिकट झालेलं आहे कीं राज्य चालवणं सोपं पण हें दोन बायकांचं राज्य चालवणं नको असं मला झालेलं आहे ! अरे, पण इथें कुणीच कसं दिसत नाहीं ? ( आशेनें ) मस्तानीचा मुलगा पाह्मला गेली असेल का ही ? असं असेल तर माझ्या आयुष्याचा हाच पहिला सोन्याचा दिवस मी समजेन !

[ मंजिरी येते. ]

**बाजी०**—काय ग ती कुठें आहे ?

**मंजिरी**—बाईसाहेब—

**बाजी०**—( हंसून ) मस्तानीच्या महालांत गेली आहे वाटतं ? होय ना ?

**मंजिरी**—त्यांचं डोकं चढलंय् म्हणून त्या थोड्याशा पडलेल्या आहेत !

**बाजी०**—( विरस होऊन ) डोकं चढलंय् का ? ( स्वगत ) माझा असा विरस आतां क्षणोक्षणीं होणार ! पण मी त्याला तयार होऊनच बसलं पाह्मजे आणि एकीवरचंही प्रेम तिळमात्र कमी करतां उपयोगी नाहीं.

**पद ४० वें.**

( चाल—चंचला लछमीये )

**लाभतें काय सुख करि बहु ललना । रिझविं मना पुरवि कामना । दारुण सुख जरि भुलवितें मना अन्ति ताप कोप शाप ।। धृ० ।। अनुभव कटु करि परिणयाचा विरस अजि साचा परि नच दुरावित । काल हानिपर ।। १ ।।**

मंजिरी—तिकडे चलावं सरकार !

गोविन्द०—सरकार, अप्पासाहिबांनीं आपल्याला बोलावलय्‌ !

बाजी०—कां रे, मधेंच ?

गोविन्द०—वसईतनं अनन्त रघुनाथ आलेले आहेत व तिकडे धर्माच्या बाबतींत अतिशय जुलूम चालला असल्याच्या हकीकती ते सांगत आहेत !

बाजी०—काय ? धर्माच्या बाबतींत जुलूम ? नाहीं, नाहीं ! मराठ्यांचं साम्राज्य अस्तित्वांत असतां धर्माच्या बाबतींत कुणाचाही जुलूम चालतां उपयोगी नाहीं !

गोविन्द—रावसाहेब, वसईचे लोक ज्या हकीकती सांगत आहेत त्या ऐकून अंगावर कांटाच येईल ! मानवी प्राण्याच्या हातून इतका जुलूम होत असेल असं शक्य देखील वाटायचं नाहीं !

बाजी०—मग चल चल ! अनन्त रघुनाथ कुठें आहेत तें मला सांग

( जातात. )

मंजिरी—बरं झालं कीं ह्या वेळीं सरकारस्वारी इकडे नाहीं आली.

( जाते. )

[ पदमकुंवारी बाळ घेऊन प्रवेश करते. ]

पद्म०—मला वाटलंच होतं कीं काशीबाईसाहेब यायच्या नाहींत ! आज बारसं ! आज तरी त्या येतात का बघावं ! त्या कदाचित्‌ लाजेकाजेनं आज येतील ! पण त्यांच्या त्या येण्यांत खरं प्रेम राहाणार नाहीं ! मग काय करावं ? काशीबाईसाहेबांच्या पुढें ह्या बाळाला कसं ठेवावं ? सवतीच्या डोळ्यांत लकलकणारे किरण—किरण कसले ? विषच तें !—तें विष ह्या बाळाच्या अंगावर कसं साण्डूं द्यावं ? सापाच्या दांतांतलं विष ! तें विष फार बरं ! पण सवतीच्या दृष्टीचं विष ! छेः छेः ! तें विष लोखण्डाच्या खाम्बांची राख करून सोडील—मग ह्या सोनुकल्या जिवाचा काय पाड ? नाहीं ग बाई ! ह्या सोनुकल्याला मला आज सम्भाळलंच पाहिजे !




ब्रह्मेन्द्र०—नीच मनुष्या, विहिरींत तूंच पाव टाकलेंस ! ( पान ११४ )

[ पडदा पडतो. काशीबाई प्रवेश करते. ]

**काशी०**—आज त्या मेलीच्या पोराचं बारसं ! हाय, हाय ! ही गोष्ट नुसती आठवली म्हणजे माझ्या मनाला किती यातना होताहेत ! काय ? त्या मेलीच्या पोराचं बारसं ! सवतीला पोरं झालीं म्हणजे माझ्या पोरांचं काय होणार ? तिला मूल झालं त्या दिवशीं तोफा झाल्या—माझा नाना झाला त्या दिवशींही अशाच तोफा झालेल्या होत्या ! काय ; माझ्या नानाचे मानसन्मान त्या सवतीच्या पोराला ? हें काय ? काय हे माझे धिण्डवडे ! ही सवत आतां माझ्या घरांत घुसणार ! ही सर्पीण—ही वाघीण—ही डाकीण—आतां माझ्या घरांत घुसणार आणि माझी पिलं !—हाय, हाय !—हाय, हाय ! ( धाडदिशी खालीं पडते. )

[ पद्मकुंवारी प्रवेश करते. ]

**पद्म०**—काशीबाईसाहेब—

**काशी०**—( भ्रमांत हंसून ) काय ? येणं झालं ? कुणीकडन येणं झालं ? निजामाकडनं येणं झालं का बुन्देलखण्डांतनं येणं झालं ?

**पद्म०**—हें प्रकरण गेलं आतां हद्दीच्या बाहेर ! आतां कांहीं हें लवकर ताळ्यावर येत नाहीं !

**काशी०**—पण आपण हें असं कसं केलंत हो ? माझ्या उरावर सवत कशी आणलीत ?

**पद्म०**—खरोखर मला ह्या वेळीं पुरुष व्हावंस वाटतयं ! निदान गंमत बघण्याकरितां तरी दोन बायका मी खचीत केल्या असत्या ! कध्धीं सोडलं नसतं !

**काशी०**—( एकदम मोठ्यानें हंसून ) घ्या, घ्या ही साखर ! ही साखर किनी पित्तशामक असते ! पित्त झालं कीं सवतीला पोरं झाल्या बद्दलची साखर खावी.

**पद्म०**—( स्वगत ) ह्यांनीं माझीं बोटं माझ्याच डोळ्यांत घातली ! पण हें बरं झालं ! ह्या प्रकारावरनं तरी आतां आमचे डोळे उघडले पाहिजेत आणि मस्तानीला सांगून बाळाला अतिशय जपलं पाहिजे !

काशी०—( साखर दिल्यासारखें करून ) ही–ही साखर खा, अहो–मस्तानीला मुलगा झाला ! ती–त्यांनीं तिकडनं आणली आहे ना ! मस्तानी तिला मुलगा झाला !

पद्म०—वाः ! केवढी नवी बातमी ही सांगतीय मला !

काशी०—पण–पण–आतां कसं होणार ? माझ्या मुलांचं कसं होणार ? हें काय केलंत ? हें तुम्हीं काय केलंत ? माझ्या उरावर सवत कशाला आणलीत ? ती सर्पीण–ती वाघीण--ती डाकीण--अहो, आतां माझीं मुलं–( एकदम खालीं पडते. )

पद्म०—बस ! बस झाला हा प्रकार ! पद्मकुंवारी, तूं वेळेवरच उमजलीस ! नाहीं. तर सवतीमत्सरामुळें तुझी ही अशीच अवस्था झाली असती ! ( जाते. )

काशी०—( सावध होऊन ) मंजिरी, अग मंजिरी–

मंजिरी—( प्रवेश करून ) काय बाईसाहेब ?

काशी०—आत्तां कुणी आलं होतं का ?

मंजिरी—मी इथें नव्हतेंच बाईसाहेब !

काशी०—हें बघ, माझा किनी किंचित डोळा लागला आणि तितक्यांत मला असं स्वप्न पडलं कीं मस्तानीबाईच्याकडनं ताईसाहेब इथें आल्या ! मी त्यांच्याशीं कांहीं बोलल्याचाही मला भास झाला ! पण मी काय बोललें कुणाला ठाऊक ! माझ्या मनाला कीं नाहीं, त्याची मोठी चुटपुट लागलीय !

मंजिरी—बाईसाहेब, स्वप्नांत माणूस वाटेल तें बोलतं ! पण तें ऐकूं का जातं कुणाला ?

काशी०—अग, स्वप्नं देखील कधीं कधीं खरीं असतात ! हरिश्चन्द्रानं विश्वामित्राला स्वप्नांतच दान दिलं—पण तें खरं करावं लागलं ना ?

मंजिरी—मग बाईसाहेब, आपल्याला कुणाला राज्य का दान द्यायचं आहे ?

काशी०—( अमाचा झटका येऊन ) अग ती सर्पीण—ती वाघीण—ती डाकीण—

मंजि०—( भिऊन ) इश्श ! बाईसाहेब, हें काय सांगतां आहां ? माझा जीव बाई भ्यायला लागला !

काशी०—( शुद्धीवर येऊन, हंसून ) अग, खरंच ! आज मस्तानी बाईच्या मुलाचं बारसं आहे चल—चल—तिकडे !

[ पडदा उघडतो. पडद्यांत शिंग ऐकूं येतें ! ]

पद्म०—हें पहा शिंग ! काशीबाई आणि बाजीरावसाहेब आले वाटतं !

[ मस्तानी आणि बाजीराव जोडीनें येतात. ]

पद्म—मस्तानी, ये बाई इकडे ! हं बस इथें ! कशी ग वेडी आहेस तूं ? बाळाला नाहीं आणलंस ?

मस्तानी—त्याला कि नाहीं झोंप लागली आहे पाळण्यांत !

पद्म०— हे पहा गहूं पसरलेले पाट ! ह्यांच्यावर आतां तिघांनीं बसायचं ! ( बाजीरावास ) आपल्याला ही मोठी कवाईतच वाटत असेल नाहीं ?

बाजी०— ताईसाहेब, कवायतीकरतांच आमचा जन्म आहे !

पद्म०—( हंसून ) पण ही बायकांची कवाईत आपल्याला नाहीं यायची ! ही आमची आह्मांलाच ! ह्यांत पुरुष नवशिकेच ठरणार !

बाजी०—( हंसून ) नाहीं, ताईसाहेब, ही कवाईत देखील आह्मी उत्तम करून दाखवूं ! ताईसाहेब—

[ गोविन्दपन्त प्रवेश करतो. ]

गोविन्द०—शाहूमहाराजांकडनं साण्डणीस्वार आलेला आहे ! वसईच्या प्रकरणासम्बन्धानं विचार करायला असाल तसं बोलावलंय् !

बाजीराव—असाल तसं ? ठीक आहे ! महाराष्ट्राच्या सेवेकरितां हा बाजीराव नेहमीं कम्बर कसून तयार आहे !

पद ४१ वें.

हा रणसमय सुखकर कसा न व्हावा ? । मजलागीं । स्वजनविजय-यश शुभकर । मधुर ज्यांत ठेवा ॥ ध्रु० ॥ स्वराष्ट्रसेवा असे ध्येय मनुजाचें । विषय दुसरा न ठावा । वितरि तोष । निजदेशपदीं । देह जावा ॥ १ ॥

[ एकदम निघून जातो. ]

मस्तानी—( स्वगत ) ह्यांच्या ह्या बाणेदार वर्तनानं ह्यांच्यावरचं प्रेम शतपट वाढतं !

पद ४२ वें

येइ भरती प्रीतीच्या सागरा ॥ ध्रु० ॥ मनासि राहि न अवधि । पुन्हां पुन्हां उसळे । सुखांत नाजुक भरती । कशी किती न कळे । सर्व परी रे । प्रेमळ नाथा । हारिसि भान, कान, तहान, जाण । वीरा ॥ १ ॥

पद्म—चला, आंत जाऊं !

[ सर्व जणी आंत जातात. आंत पाळणा दिसतो. ]

काशी०—काय ? हा पाळणा ? हें बाळ ? मस्तानीबाई, हें तुमचं बाळ ? ( तिचा मत्सर एकदम पेट घेतो. ) सर्पीण—वाघीण—डाकीण—( भयंकर डोळे करते. ) मग माझीं मुलं ?—

मस्तानी—( घाबरून ) ताई धांव, धांव ह्या पहा कशा करताहेत !

पद्म०—( आंतून बाळ घेऊन येऊन ) मस्तानी, घाबरूं नकोस ! पाळण्यांत बाळ नाहींच ! तुझा मुलगा हा समशेरबहाद्दर हा मजजवळ सुरक्षित आहे !

काशी०—काय ? मीं काय केलं ? मी काय करीत होतें ? ( मूर्च्छित होऊन पडते. तिला मंजिरी सांवरते. )

पद्म०—तुह्मीं कांहींही केलंत तरी हा समशेरबहाद्दर सुरक्षित आहे ! हा बाजीरावांचा मुलगा बाजीरावांइतकाच मराठी साम्राज्याला उपयोगी पडणार !

काशी०—हाय ! मी काय केलं ? ( शून्य दृष्टीनें पाहाते. तिला बाजीराव दिसतो. ) आपण–आपण–आपण रागावलां ? नका, नका, आपण रागावूं नका. आपण नसतांना आपलं बाळ–खरंच तें माझंच आहे! तो माझा नानाच ! शपत–शपत–अगदीं आपल्या पायांची शपत ! मी त्याला कांहीं करणार नाहीं ! हा पहा मी त्याला आपल्या माण्डीवर घेतें !

[ बाजीराव आपल्याला खूण करीत आहे असें तिला वाटतें. ]

काशी०—ही पहा, आपली आज्ञा मीं पाळली ! होय, होय ! मस्तानीचं मूल तें माझंच मूल ! ( हंसतमुखानें ) आणा, ताईसाहेब, बाळाला आणा इकडे ! द्या त्याला माझ्या माण्डीवर !

मस्तानी—( घाबरून पदमकुंवारीस एकीकडे ) नको ताई, त्याला नको देऊं त्यांच्याजवळ !

पदम०—( तिला एकीकडे ) अग, आतां वादळ निवळलं ! माणसाची परीक्षा त्याच्या डोळ्यांवरनं करावी !

काशी०—आणा, ताईसाहेब, आणा, आणा, बाळाला लवकर !

पदम०—हा घ्या !

[ एकदम आंतून पुष्कळशा स्त्रिया येतात. त्या दोघींवर फुलें उधळतात. हळदीकुंकू आणि ओटीभरणें सुरू होतें. ]

पदम०—आतां सगळं चांगलं झालं !

पद ४३ वें.

ये भारी । हा प्रेमरंगा गोडवा । हा भासे । आजचि सुन्दर पाडवा ॥ धृ० ॥ घ्या आतां । पदरांत ओटी सुमंगला । हा लावा । कुंकुमतिलकहि चांगला । घ्या हातीं । बाळ तया बहु लाडवा ॥ १ ॥

[ पद ह्मणत ह्मणत सर्व स्त्रियांना आणि अखेरीस काशीबाईना हळदीकूंकूं देते. पडदा पडतो. ]

अंक चवथा समाप्त.

———

## अंक पांचवा.

—x—

### प्रवेश १ ला

—•—

[ कोकिळा मावशी आणि रुबी प्रवेश करतात. ]

कोकिळा—हें बघ मी तुझ्याकरितां थोडे का उपाय केले ! पण तुला कोणताच देव प्रसन्न होत नाहीं त्याला मी तरी काय करूं ?

रुबी०—पण मावशी त्यांच्याशिवाय मी आतां दिवस तरी कसे काढायचे बरं !

कोकिळा—रडूं नको बरं अशी बापुडवाणी ! रम्भाताई—अग माझं जरी असं झालंय् किनी—तरी तुमचं दुःख मला चांगलं कळतं बरं !

रुबी०—मग मावशी, कांहीं तरी तोड काढा न् माझी व माझ्या पतीची भेट करवा !

कोकिळा—तोड न् फोड ! तुझे आपले कांहीं कांहीं विलक्षणच शब्द ! ( विचार करून ) हें बघ, तूं एक गोष्ट करायला तयार होशील का ?

रुबी०—हें पहा, देवदंवापैकीं मी वाटेल तो उपाय करायला तयार होईन ! चर्च—देवळं—मशिदी—खिस्त—कृष्ण—हसन ह्यांपैकीं वाटेल त्याच्या पायां पडेन—पण एकदा माझा पती मला भेटवा हो !

कोकिळा—हें बघ—आमच्यांत कांहीं व्हावं अशी इच्छा असली कीं नाहीं, म्हणजे सत्यनारायण करतात ! तूं होशील का सत्यनारायण करायला तयार ?

रुबी०—मावशी, तयार न व्हायला काय झालं ? होईन बरं !

कोकिळा—हें बघ, अन्तुभट इतके दिवस इथें नव्हते ! ते गांवाला गेलेले होते. ते नुक्तेच आलेले आहेत इथं ! त्यांना आतां सांगतें तुझ्याकरितां सत्यनारायण करायला ! पण त्याला प्रसाद करावा लागतो हो ! करशील ना ? खर्च लागतो त्याला !

रुबी०—मावशी, पतीपेक्षां का पैसा अधिक आहे ? ह पहा वाटेल तितका खर्च येवो—मी तो करायला तयार आहे !

कोकिळा—अग, केळीचे खाम्ब लागतात, तान्दूळ लागतात, सुपाऱ्या लागतात---अन् शिवाय सव्वा शेर रवा-- सव्वा शेर तूप—सव्वा शेर साखर सव्वा शेर—

रुबी०—हें सगळं करा ह्मणून सांगितलंना मावशी !

कोकिळा—रम्भाताई, काय प्रसाद लागतोय ! पण छेः बाई ह्या सगळ्या व्रतवैकल्यांत हा सत्यनारायण मला फार आवडतो.

दौल०—( प्रवेश करून ) आणि मलाही फार आवडतो ! केव्हां केव्हां मला सांजा खायची हुक्की आली ह्मणजे मी सत्यनारायणच करतों.

रुबी०—मग चला गडे लवकर -( दोघी जातात. )

दौलत०—मी इतक्या वेळां सत्यनारायण केला आणि इतक्या वेळां प्रसाद खाल्ला पण शेवटीं माझा एकही हेतु सिद्धीस गेला नाहीं ! उलट रोशन बिबीच्या हातचा खूप प्रसाद मात्र मिळाला ! अहो, बायकांच्या करितां थोडा का प्रयत्न मी केला ? आजपर्यंत मी ज्या ज्या बायकांच्या पाठीस लागलों त्यांची नुसती यादी केली तरी एखाद्या मारवाड्याची चोपडी भरून निघेल ! पण एकही स्त्री मला वश झाली असेल तर शपथ ! आतां अगदीं शेवटचा डोळा ह्मणजे ह्या-( खांकरतो ) ह्या-( पुन्हां खांकरतो )--ह्या कुणावर ? ह्या पोरीवर नव्हे--मी पाह्यलं आहे कीं पोरीबाळींचं न् आपलं जातक जमत नाहीं—ह्या कोकिळा मावशीवर ! तेवढं जमलं नाहीं कीं मग संन्यास घ्यायचा आणि नरसोबाच्या वाडीला निघून जायचं ! ( जातो. )

( पडदा उघडतो. कोकिळामावशी धाबळी नेसून प्रवेश करितात. केळीच्या खाम्बांत देव माण्डले आहेत. अन्तुभट सत्यनारायण सांगत आहेत. )

ॲण्टो०—अन् मग जे आहेत्ते प्रसाद भक्षण करावा ह्मणजे साधुवाण्याचे मनोरथ जे आहेत्ते जसे पूर्ण झाले तसेच जे आहेत्ते सर्वांचेही मनोरथ पूर्ण होतील ! हरयेनमः ! हरयेनमः ! हरयेनमः !

कोकि०—आणूं का आतां प्रसाद ?

ॲण्टो०—( पोटावरून हात फिरवून ) हो हो ! जे आहे त्ते घेऊन या !

कोकि०—त्या बाईला आणूं का नमस्काराला ?

ॲण्टो०—ती परजातीची आहेना ? तिला ह्या इकडनं अशी आणा ! ( श्रोत्यांना ) ही सत्रंजी जरा आवरून घ्या अं ! ती बाई यायची आहे !

[ कोकिळा मावशी उड्या मारीत जाते आणि रुबीला घेऊन येते. रुबी नमस्कार करायला जातें. ]

ॲण्टो०—( भान नाहींसें होऊन ) कोण माझी रुबी ?

रुबी०—कोण ॲण्टोनियो ? ॲण्टी—ॲण्टी !

कोकिळा०—काय हाच का तुझा पती ?

रुबी०—( आनन्दानें ) होय, मावशी हाच ! अँ

( पूज्यतेनें त्याच्या गळां पडायला जाते. " अरे हा किरिस्तांव " ह्मणून लोक त्याच्या पाठीस लागतात ! )

कोकिळा०—आमटी, आमटी ह्मणतां ह्मणतां शेवटीं खरंच आमटी झाली ! पण मेलं समाधान एवढंच कीं ह्या रम्भाताईला सत्यनारायणाच्या प्रसादाचं फळ मिळून तिचा नवरा तिला भेटला ! आहे कीं नाहीं आमचा सत्यनारायण खरा ? ( झटक्यांत निघून जाते. )

---

## अंक पांचवा

—×—

### प्रवेश २ रा.

—:०:—

बाजीराव०—( स्वगत ) लढाईवर जाण्यासाठीं प्रिय पत्नीचा तर निरोप घेतला ! आतां—पण - गोविन्दराव, गारपिरावर डेरे दाखल व्हायला हुकूम केला आहे कीं नाहीं ?

गोविन्द०—सरदारांचीं सैन्यं तिकडे केव्हांच गेलीं आहेत सरकार !

( मुजरा करून जातो ) [ नानासाहेब प्रवेश करतात. ]

नाना०—रावसाहेब मी लढाईवर येणार !

बाजी० – ( हंसून ) अरे लढाई ह्मणजे लगोऱ्यांचा डाव नव्हे !

नाना०—तो लगोऱ्यांचा डावच आहे ! आतां महाराष्ट्रीय लोकांना युद्ध ह्मणजे लगोऱ्यांचा डावच आहे ! रावसाहेब, वाघाला ज्याप्रमाणें हरिण हा खायचा पदार्थ दिसतो त्याप्रमाणं राष्ट्र स्वातंत्र्यासाठीं युद्ध करणाऱ्या आम्हां मराठ्यांना शत्रुभक्ष्य पदार्थ वाटतात ! रावसाहेब शत्रु, शत्रु आम्ही मराठे शत्रूला खाऊन टाकूं—त्यांचा जगांत नापत्ता करून टाकूं !

बाजी०—( त्याच्या तोण्डावरून हात फिरवून ) [ स्वगत ] तरीच माझा मुलगा !

नाना०—रावसाहेब विचार कसला करतां ?

बाजी०—( हंसून ) अरे, आपण कांहीं मुखत्यार नाहीं ! आपले धनी शाहुमहाराज आहेत ! त्यांचा हुकूम आपण घेतला पाह्यजे !

नाना०—ठीक आहे—मी शाहुमहाराजांचा हुकूम आणवतो ! त्यांना सांगतों कीं मी लढाईवर जाणार ! ! मी लढाईवर जाणार ! ( जातो. )

बाजी०—( हंसून ) ह्या मुलाची लक्षणं तर ठीक दिसताहेत ! हा मराठ्यांचं नांव राखील असं वाटतंय् ! चला लाडक्या मस्तानीचा निरोप घ्यायला जाऊं ! त्या दोघीजणी आपापसांत किती ही धुसफुसल्या तरी त्यांचे बाहु कण्ठांत पडतांना त्यांचीं अंतःकरणं माझ्या हृदयाला मिठी मारीत असतात ह्यांत संशय नाहीं ! ( पडद्याकडे पाहून ) ही पहा मस्तानी-माझंच चिन्तन करीत एकटीच बसलली आहे !—

[ ह्याप्रमाणें पडदा उघडतो. ]

( मस्तानीचा हात हातांत घेऊन ) मस्तानी—मी आत्तां मोहिमेवर निघणार ! मस्तानी—मी आत्ता मोहिमेवर निघणार !

मस्तानी०—गेलंच पाहिजे ! मोहिमा आणि लढाया म्हणजेच माझा वीरशिरोमणी बाजीराव ! पण आपल्याजवळ माझीही एक विनन्ती आहे !

बाजी०—कोणती ती ?

मस्तानी०—मीही आपल्याबरोबर लढाईवर येणार !

पद ४४ वें

नेइं मला समरिं आज ॥ धृ० ॥ कल्पतरुहि तूं सावलि मीही, कैसा पहा हा । खुले मजला । समर साज ॥ १ ॥

बाजी०—( हंसून ) मस्तानी, ही विनन्ती ऐकून मला आनन्द झालेला आहे—पण कोंकणची मोहीम फार अवघड आहे ! तिथें जमिनीवरच्या आणि समुद्रावरच्या अशा दोन्ही चकमकी झडायच्या आहेत ! आजूबाजूला शत्रूंची ठाणी आहेत ! आणि तिथला युद्धप्रसंग बराच लाम्बण्याचा सम्भव आहे ! तुझ्यासारख्या सुकुमार सुन्दरीनं तिथे येऊन लढवय्या शिपायांचीं अन्तःकरणं मृदु करण्यापेक्षां आम्ही मिळविलेल्या यशाचे हार तुझ्या कर कमलावर अर्पण करणं चांगलं नाहीं का ?

मस्तानी०—पण बायका नेहमींच नाजूक असतात असं आपल्याला कुणीं सांगितलं ? आह्मी शृंगार मन्दिरांत जितक्या नाजूक असतो त्यापेक्षां रण मैदानावर दुपटीनें कठोर होतो ! सिंहिणीची झेंप सिंहापेक्षां भयंकर असते.

बाजी०—( हंसून ) तरी ह्या माझ्या सिंहिणीला मला माझ्याबरोबर नेतां यायचं नाहीं !

मस्तानी—कां बरं ? आणखी कोणती सबब सुचली ? ( हंसून ) ह्या पुण्याच्या पाण्याचा गुणच असा आहे की इथें खूप सबबी सुचतात !

बाजी०—( हंसून ) तुझी आपली सगळी थट्टा ! पण हे बघ, समशेर बहाद्दराचा ज[illegible] होऊन अजून एक पुरा महिनाही झालेला नाहीं.

मस्ता०—पण तोही सिंहाचाच बच्चा आहे !

बाजी०—छेः पण माझं एवढं ऐकच ! अशा ओल्या अंगाने लढाई-वर येऊं नकोस ! मस्तानी तो कोंकणचा मुलूख मोठा वाईट आहे !

तो प्रखर वारा तुझ्या नाजूक अंगाला लागला तर बाधा करील ! ऐक-शील ना माझं एवढं ! ऐकशील ना ?

मस्तानी—छेः गडे, अशी आर्जवे केली ह्मणजे माणसाचा निरुपाय होतो.

[ बाजीराव मस्तानीचें चुम्बन घेण्याच्या बेतांत आहे इतक्यांत पडद्यांत " सरकार जीन करून घोडा तयार आहे. " ]

बाजी०—हा मी आलोंच ! निघालोंच मी ! ( लगबगीनें निघून जातो ) ( जातां जातां ) मस्तानी मी येतों अं ! ( जातो )

मस्ता०—( कम्बर कसून ) आणि मीही निघालेंच ! त्यांनीं नको ह्मटलं ह्मणून मी थोडीच राहणार आहे ! वीराची स्त्री वीराबरोबर समरांगणावरच उभी पाह्मजे !

पद ४५ वें

रमणि रणि उचिता । सुवीर वरित नाथा स्वता । समरिंच तळपत जणुं इह लोकीं । निज करी सकल जनहृद्य हरि शान्ता ॥ धृ० ॥
जगांत शोभे कुसुमसुमन हारा । मण्यातें नव मणि । रुचिर खचित दिसत दोनि । रचिता सुविंतिता ॥ १ ॥

( खिडकींतून डोंकावून ) काय नयन मनोहर स्वारी !

पदम०—( प्रवेश करून ) अग बाई ! कुणाला बघती आहेस ?

मस्तानी—अग—

पंचकल्याणी घोडा आबलख ग ।
जिनावर कलाबतु लख लख ग ॥
बाई सूर्य वान कलगीचें तुरे वरि अंबीर बसले ॥
छुम छननननननन पायांत घुंगुर बोले ॥ १ ॥

पदम०—( हंसून ) अग हो !

मस्ता०—अग—

झाली बोथाट्याचीं गरदी । मागें पुढें फौज अरधी मुरधी ।
दिलें निशाण साहेब गिर्दी ॥ कीं नौबत बोले ॥
चिच पट्टेवाले नऊशें रगीत झाले ॥ २ ॥

पद्म०—अग, ह्या समशेरला तरी व्यायचा होतास कडेवर !

मस्ता०—ऊं हूं ! तूंच घे त्याला ! अग—
आघाडी खाशांची फौज । मागें राहिले ।
गुलशनवाज बाई त्या अंबारीचे गज ॥
आनंदीत करीती ही किति तरी ।
सुन्दर नयना भासे मूर्ति ॥ ३ ॥
( पडदा पडतो. )

---

## अंक पांचवा

### प्रवेश तिसरा

( कोकिळा मावशी पहांटेच्या प्रहरीं प्रवेश करते )

कोकिळा—वरं झालं बाई कीं तिचा नवरा तिला सांपडला ! पण मा ह्मणतें कीं त्या अन्तुभटजीचं काय हें साहस कीं ह्या गांवीं आपला खुश्शाल ब्राह्मण म्हणून मिरवला ! छेः बाई ! कलियुग बरं हें ! ह्या कलियुगांत कोण काय करील आणि काय नाहीं ह्याचा कांहीं नेम नाहीं !

( दौलतराव प्रवेश करतो )

दौलत०—( स्वगत ) बरं झालं कीं ह्या मावशी इथे एकट्याच आहेत आतां एकदम जाऊन त्यांच्याजवळ प्रेमभाषा करावी हें बरं ! ( पुढें जातो आणि आस्यापास्याप्रमाणें त्यांचा रस्ता आडवतो )

कोकि०—इश्श ! हें कोण रस्त्यांत उभं !

दौलत०—मी आपला दौलत !

कोकि०—कोण दौलतराव ? इश्श ! असे कां उभे रस्त्यांत ? एकीकडे व्हा ! रस्ता सोडा !

दौलत०—कोकिळामावशी, हा दौलत आपला आहे म्हटलं ना ?

कोकि०—( हंसून ) अहो आम्हां बायकांना पतीशिवाय दुसरी दौलतच नाहीं ! चला व्हा एकीकडे !

दौलत०—कोकिळामावशी, माझं तुमच्यावर प्रेम आहे !

कोकि०—( हंसून ) प्रेम ! इश्श मेलं ! प्रेम हें काय असतं हो ! हें माझं असं झालं ना ? त्यामुळें प्रेमबीम सगळं तिकडच्या बरोबर गेलं ! ( पुढें चालू लागते )

दौल०—( तिला आडवून ) छेः मावशी, कुठे जातां ? आतां हा दौलत आपल्याला सोडणार नाहीं !

कोकि०—काय, सोडणार नाहीं ?

दौलत०—छेः कध्धी सोडणार नाहीं !

कोकि०—अहो, ह्या तोण्डच्या गप्पा ! एक तोण्डांत भडकावली कीं असे कोलमडत पडाल. ( त्याप्रमाणें करते. तो कोलमडून पडतो. )

दौलत०—अरे मेलों, मेलों, मेलों !

कोकि०—अहो, तुम्ही लोक असे कुठले मरायला ? आम्हां गरीब बायकांच्याकडे दृष्टि टाकल्याबद्दल तुह्मी सडून सडून मराल ! माझ्यासारख्या ब्राह्मण विधवांवर हात टाकणारे तुह्मी नुसते पशूच नव्हेत तर नरकांतले किडे आहांत ! तुम्हांला असं वाटतं काय कीं आम्हां ब्राह्मण विधवाना कुणी सम्भाळणारे नाहीं म्हणून ? अहो, बाकीच्या बायकांना सम्भाळणारे त्यांचे नवरे असतात, आह्मांला सांभाळणारा परमेश्वर असतो ! अहो आह्मी पतीला परमेश्वर मानून त्यांच्यासाठीं संसार आणि सौन्दर्य ह्याच्यावर पाणी सोडतो—ह्मणूनच परमेश्वर आमची अब्रु सम्भाळायला सदैव उभा असतो, ( हंसून ) दौलतराव आमचा परमेश्वर कुठे असतो, माहीत आहे ?

दौलत०—( रडक्या सुरांत ) कुठे ?

कोकि०—ह्या आमच्या उजव्या हातांत! आम्ही ब्राह्मण विधवा आपले दीर, भाऊ, सासरे, किंवा बाप ह्यांच्या सहाय्यावर अवलम्बून नसतो—अहो, त्यांचं सहाय्य आह्मांला हवंच असतें! पण आह्मी मुख्य आमच्या स्वतःच्या बळावर उभ्या असतों! वैधव्याचे कठीण व्रत घेतांना—पतीला आपली अलंकार भूषणं आणि शिरोभूषणं देखील अर्पण करतांना आमचा भार आमच्या स्वतःवर असतो—दुसऱ्यांच्यावर नसतो आपल्या अब्रुचं रक्षण जर आह्मी दुसऱ्याच्या हातांत ठेवूं तर ह्या जगांत एकही दिवस आमची अब्रु रहाणार नाहीं! आमच्या अब्रूचं रक्षण आमच्या हातांत आहे, ह्या आमच्या हातांत आहे, समजलांत?

दौल० (रडत) चांगलेंच समजलं! अजून माझा गाल हुळ-हुळतो आहे.

कोकि०—मग उठा, माझ्या पाया पडा! आपल्या आईबहिणीकडे पापी नजरेनं बघायला तुह्मांला लाजा नाहीं वाटत? चला, उठा, पडा माझ्या पाया! लक्षांत ठेवा कीं अल्पवयांत वैधव्याचं व्रत घेणाऱ्या आह्मी ब्राह्मण विधवा—तरवारीची धार आहोंत—वाघिणीची नखं आहात—आगीची ज्वाला आहोंत!

दौल०—मावशी आजपासनं प्रत्येक स्त्री माते समान! (सपशेल पायां पडतो.)

मावशी०—काय मेले बेशरम लोक तरी! (हंसत हंसत निघून जाते)

दौल०—काय? जातांना मला बेशरम ह्मणाली? सूड—सूड—सूड! संन्यास घ्यायच्या अगोदर मला ह्याचा सूडच घेतला पाह्यजे. (जातो.)

(रूबी आणि ॲण्टोनियो देवळाचे बाहेर प्रवेश करतात)

रूबी०—नो, नो, आपलं हे करणं मला बिलकूल आवडलं नाहीं!

ॲण्टो०—अग, आपला धर्म वाढीवण्याकरितां मी हें केलं!

रूबी०—पण आपण हे फार वाईट केलं! अशा रीतीनं धर्म वाढवावा अस प्रभु येशूनं कुठेंही सांगितलेलं नाहीं!

ॲण्टो०—काय ? माझं हे कृत्य त्याला पसन्त नसेल असं ह्मणतेस ?

रूबी०—खात्रीनं पसन्त नसेल ! हिन्दु लोकांना चकवून व त्यांच्या धर्मसमजुतीचा फायदा घेऊन केलेले ख्रिस्ती हे खरे ख्रिस्ती नव्हेत ! प्रभु येशू अन्तःकरणाचा चाहता आहे–अन्तःकरणाचा भुकेला आहे !

[ दौलतराव प्रवेश करतो. ]

दौलत०—( स्वगत ) ह्या दोघांचा इथे रंग उडवायचा विचार दिसतो ! पण आतां हे कसचा रंग उडवितात ! कोकिळा मावशीचा सूड उगाविण्याकरितां मी इथल्या विहिरींत पावाचे आणि मांसाचे तुकडे टाकून दिलेले आहेत ! त्याबद्दलचा गवगवा झाला कीं लोक नेमके ह्या ॲण्टोनि॰योला ऊर्फ अन्तुभटजीला पकडणार ! माझा कुणाला संशय देखील यायचा नाहीं ! वाः ! काय हें माझं डोकं ! सापाचं वेटोळं पाहुण्याच्या गळ्यांत अडकावून आपण आपला मोकळा तो मोकळा ! [ मिशीवर पीळ देत निघून जातो. ]

ॲण्टो०—रुबी, पटलं तुझं बोलणं मला ! चल आता गोव्याला परत !

रुबी०—हं जाऊं, पण पहिल्यान्दा आपल्या मावशीना भेटूं ! तिच्या इतका भोळा पवित्र जीव मी कुठंच पाह्यला नाहीं.

ॲण्टो०—छेः छेः जीव गेला तरी आतां कोकीळा मावशीना मी तोण्ड दाखवायचा नाहीं !

रुबी०—असं काय बरं ? कमॉन् कमॉन् [ ती त्याची कॉलर ओढीत घेऊन जाते. नन्तर सुलेमान आणि रोशन बिब्बी प्रवेश करतात. ]

सुलेमान—नहीं नहीं, प्यारी तूं ऐसी कहेगी तो इस्लामी मजबका फैलाव कैसा होगा ?

रोशन०—इस्लामी मजब के नासिहत करो—इस्लामी मजबका सब दुनियामें नासिहत करो–उस्के वास्ते पैसा दो–आभी दो—जानकी जरूरत

होगी, तो जानभी दो ! मगर इस्लामी मजबके नामसे किसीपर जुल्म और जबरदस्ती न करो !

सुले०— प्यारी तेरी कहेना हक् है !

रोशन०—तो चलो अपने मुल्कको ! ( पडद्याकडे पाहून ) एँ ! ये क्या ! यहां कितनी भीड ?

सुले०—( पडद्याकडे पाहून ) मेरा दोस्त अन्तुभटजी भी आ रहा है ! चलो, चलो ! जलदी !

[ नन्तर देवळाचे दाराजवळ लोकांची खूप गर्दी झालेली आहे व कोकिळामावशी दुःखांत आहेत असा पडदा उघडतो. ]

सर्व लोक०—तुम्ही आतां बाटलां—खिस्ती झालां ! व्हा चालत्या आमच्यातनं !

कोकि०—( रडत ). नाहीं हो—मी मुद्दाम कांहीं एक केलं नाहीं ! मी मुद्दाम केलं असतं तर मात्र मी अपराधी झालें असतें ! आमच्या विहिरींत कुणी मेल्यानं काय टाकलं त्याचे हात झडून झडून जावोत !

सर्व लोक०—तरी पण तुम्हीं बाटलांच !

कोकि०—मी प्रायश्चित घेतें--काशीला जातें--सहस्र भोजनं घालते--पण आपल्या हिन्दुधर्मांतनं मला असे नका हो ढकलून देऊं !

सर्व लोक०—नाहीं. नाहीं ! आम्हीं तुम्हांला हिन्दुधर्मांत घेणार नाहीं !

[ दौलतराव प्रवेश करतो ]

दौलत—नका--नका ह्या बाईला हिन्दुधर्मांत घेऊं नका ! आपला तो पवित्र हिन्दुधर्म--ते पवित्र ऋषी--ती पवित्र तपोभूमि--नका नका तुम्हांला श्रीकृष्णाच्या पायाची शपथ आहे--ह्या बाटग्या बाईला हिन्दुधर्मांत घेऊन आपला तो पवित्र आर्यधर्म बाटवूं नका !

कोकि०—( सन्तापानें ) मेल्या तुझी जीभ झडेल—तुझ्या तोण्डांत किडे पडतील कोण रे बाटगं ?

दौल०—तूं--तूं बाटगी !




पद्म०—अहोपण याची मुंज आज झाली ! काशीबाई साहेबांनीं ह्याला मांडीवर घेतला. (पान १२३.)

कोकि०—मेल्या नीट विचार करून बोल !

दौल०—मी विचार करूनच बोलत आहे ! तुझे घरांत अन्तुभटजीचा सत्यनारायण झाला कीं नाहीं ? एका ख्रिश्चन बाईबरोबर तूं प्रार्थना केलीस कीं नाहीं ?

कोकि०—होय ! पण म्हणून काय झालं ?

दौल०—काय ? तरीही हिन्दुधर्म बाटला नाहीं ! मग बाई शर्थ झाली तुझ्यापुढें ! अग कुणीकडे आपला पवित्र आर्य धर्म व कुणीकडे हें तुझं भ्रष्ट आचरण !

कोकि०—काय ! मी भ्रष्ट आणि चाण्डाळा—

दौल०—( हंसून ) पुरे, पुरे ! आतां शिव्याशाप पुरेत !

सर्व लोक०—जे जे कुणी त्या विहिरीचं पाणी प्यायले असतील त्या साऱ्यांना धर्मांतनं हांकलून द्या ! ( पडद्याकडे पाहून ) अहो, पण तो अन्तुभटजी आलाच ( डोळा मिचकावून ) येतांना एक पात्रही आणलं आहेन त्यानं ! ठोका, ठोका चोपा त्या माणसाला !

( सर्व लोक ॲण्टोनियोच्या अंगावर धाऊन जातात इतक्यांत ब्रम्हेन्द्र स्वामी प्रवेश करतात. )

ब्रह्मेन्द्र०—नाहीं, नाहीं, त्यांच्या अंगावर हात टाकूं नका !

[ सर्व लोक थबकतात. ]

दौल०—महाराज, ह्यानं गांव बाटविण्याकरितां विहिरींत पाव टाकले आणि ह्या बाई तें तसलं पाणी प्यायल्या ! ह्या बाई ह्याप्रमाणं बाटलेल्या आहेत महाराज—

ब्रह्मेन्द्र०—नाहीं, नाहीं, बाई बाटलेल्या नाहींत—आणि दुसरं कुणीही बाटलेलं नाहीं ! चुकीनं किंवा जबरदस्तीनं कुणाचा कितीही दोष घडला त्यामुळं हिन्दुधर्म बाटत नाहीं !

कोकि०—( आनन्दानें ) अहाहा हे भला परमेश्वर भेटले !

ब्रह्मेन्द्र०—शिवाय मी तुम्हांला असं सांगतों कीं हे पदार्थ विहिरींत ॲण्टोनियोनी टाकले नाहींत !

[ सुलेमान व रोषनबिब्बी येते. ]

दौलत०—मग ह्या सुलेमाननीं टाकलें असतील !

ब्रह्मेन्द्र०—नाहीं, नाहीं, त्यानींही टाकलेले नाहींत !

दौलत०—मग ते कुणी टाकल असतील बोवा ?

ब्रह्मेन्द्र०—नीच मनुष्या ते तूं टाकलेले आहेस आणि त्याचा आळ तूं त्यांच्यावर घेतो आहेस !

दौलत०—काय, मी ?

ब्रह्मेन्द्र०—होय, होय, तूं ! मुकाट्यानं आपला अपराध कबूल कर—नाहीं तर—

दौलत०—( भिऊन ) ( स्वगत ) अरे हे मला जाळून देखील टाकतील आतां खरं बोलावं ! ( उघड ) महाराज मी फार अपराधी आहे मला क्षमा करा ! ( साष्टांग नमस्कार घालतो. )

सर्वलोक—नका, नका, महाराज त्याला क्षमा करूं नका !

दौलत०—पण महाराज, मला आतां खरा पश्चात्ताप झालेला आहे ! मी आतां नरसोबाचे वाडीला जातों व तिथे संन्यास घेतो !

ब्रह्मेन्द्र०—नाहीं, नाहीं आतांच घे व ह्या भार्गव मठांत गायत्री पुरश्चरण करीत बैस ! ( दौलतराव जातो ) काय, ॲण्टोनियो, काय, सुलेमान—तुह्मीं आमचा धर्म बाटविणार होतां ना ?

ॲण्टो०—महाराज, आमची चुकी झाली !

ब्रह्मेन्द्र०—बंधूनो, खरा विचार केलातर धर्म हा कुणाचा द्वेष करण्याकरितां नाहींच—तो दृष्टी उजळण्याकरितां आहे !

सुलेमा०—आपका कहिना सच है !

ब्रह्मेन्द्र०—अहो, हे धर्माचं राज्य समतेचं राज्य आहे, ह्या राज्यांत हिन्दु मुसलमान—हिन्दु खिस्ती हें सारे समसमान आहेत !

यारे यारे सर्व जन ।
लुटा देवींचे घन
यारे यारे सर्व भाऊ
लुटा देवाजीचा खाऊ
यारे पन्त मिस्टर मुल्ला
ध्यावा राम खिस्त अल्ला
खोला दृष्टि उघडा डोळे
भेदभाव सारा गळे

[ तिथें एकदम खिस्ती चर्च दिसूं लागते. ]

ॲण्टो०—अहाहा माझे डोळे निवळले !

रुबी०—हें पहा आमचं चर्च !

[ ट्रॅन्सफर सीन मशीद दिसूं लागते ]

रोशन०—वाह, वाह ! ये हमारी मसजीद !

[ दौलतराव संन्यास घेऊन येतो ]

दौलत०—अहाहा, हा आमचा पवित्र भार्गव मठ ! आतां माझे डोळे उघडले !

ब्रह्मेन्द्र०—उघडणारच ! धर्माचा पुण्यप्रभावच तसा आहे.

पद ४६ वें

अविचला । सुखकला हरि अघमेखला ॥ ध्रु० ॥ करि सत्यसाह्यता । पापासि सुविरोध । मन शान्त करिधर्म जाणोनि शीला ॥ १ ॥

---

## अंक पांचवा.

### प्रवेश चवथा.

[ बाजीराव साहेब प्रवेश करतात. ]

बाजीराव०—शाबास, रणमर्दांनों, शाबास ! अतिशय मर्दुमकी गाजि-वलीत ! हा होळीचा सण, शत्रूची होळी करून उत्तम रीतीनं साजरा

केलात ! आतां विजयाचा रंग उडवून रंग पंचमी साजरी करा ! सण करणं म्हणजे पक्कान्न झोडणं नव्हे तर राष्ट्रदेवतेच्या कण्ठांत विजयाची माळ घालणे हाच सण साजरा करण्याचा खरा मार्ग आहे ! देवीची पूजा निरां-जनं आणि उदबत्त्या ह्यांनीं सार्थ होत नाहीं तर राष्ट्रदेवतेच्या पुढें ज्या वेळीं विजयाच्या नौबदी वाजवाव्यांत त्याच वेळीं देवीची पूजा सार्थ होते. शिरा, रणमर्दानों, शत्रूच्या ठाण्यांत शिरा आणि विजयाच्या नौबदी झडवून राष्ट्रदेवतेला सन्तुष्ट करा ! तिकडे वसईस चिमाजी अप्पाची सरशी होत आल्याची आनन्दाची बातमी आलेली आहे—ह्या वेळीं तुम्हीहि फत्ते मिळवाल तर सम्बन्ध कोंकण हस्तगत होऊन आरमारी अधिपत्यांत निर्वीर्य भूवीतलं होण्याचा श्रीशिवाजी महाराजांचा पवित्र संकल्प सिद्धीला जाईल ! ( जातो. )

[ मस्तानी पुरुष वेशानें प्रवेश करते. ]

**मस्तानी**०—अहाहा ! हा कुणाचा हुकूम ! माझ्या नाथांचा ! ह्या हुकमांत दोन प्रकारची जादु भरलेली आहे ! हा माझा नाथ—म्हणून ह्याच्या हुकमांत जादू आहे, आणि हा मराठी राज्याचा सेनाधुरन्धर म्हणून ह्याच्या हुकमांत आणखी एक जादु आहे। अहाहा, ह्या जादूनं हे मावळे—हे धनगर—हे कोळी—हे भिल्ल—हे देखील मारून जाऊन हातावर शीर घेऊन लढाईला तयार झाले, मग मीच कशी मागं राहूं ? आज हा किल्ला मी सर करणार ! आणि ही बाजीराव साहेबांची अर्धांगी ह्या किल्यावर भगवा झेण्डा फडकावून माझ्या नाथांची मोहीम सर्वांगपरिपूर्ण करणार ! ( हंसून ) बरं झालं कीं मी मागं छावणीवरच आहे अशी तिकडची कल्पना आहे—नाहीं तर हा पुरुष वेष घेऊन प्रत्यक्ष लढाईवर शिरायला मला परवानगी मिळणं फार कठीण गेलं असतं ! ( पडद्याकडे पाहून ) अहाहा, तटाची ही बाजू शत्रूच्या किल्ल्यावर चढायला फार चांगली आहे ! चढावच तर झकडनं !

[ ती तटावर चढल्यासारखी दिसते व अदृश्य होते. तटावरून कांहीं माणसं एकदम खालीं पडल्यासारखी वाटतात. गुलाम कादिर प्रवेश करतो. ]

गुलाम०—एँ ! ये क्या गिरा ! ( तटावरून खालीं पाहून ) अफसोस् ! अफसोस् ! हमारे सिपाहींको ये मराठे लोगोने काटा और अब् दुष्मन् किल्लेमें घूस गये ! अंर अब, ऊठो भागो, जान बचावो ! (स्वगत) अब् मुझे भी भागना चाहीये ! नहीं तो ये मरेठे लोग मुझे जरूर गिरफ्तार करेंगे ! ( इकडे तिकडे पाहून ) जाते वख्त ये खजीना भी ले जाना अच्छा ! निजामुल्मुल्ककी नौकरी छोडकर सिद्दी की नौकरीपर मैं आया—तो इसमें मुझे इतनाही फायदा दिखता है ! जिसको खुदका फायदा देखना है उसने अपना मालिक जिन्दा रहेगा कि मर जायगा इसकी फिक्र नहीं करना चाहिये ! ( खजिना घेऊन खालीं उतरतो ) ( इकडे तिकडे पाहून ) इस रस्तेपर कोई नहीं दिखता ! छूप छूपके इस बाजू भागने को मिलेंगा ! ( पुढें जातो )

[ पद्मकुंवारी व समशेर बहादूर प्रवेश करतात. ]

पद्म०—( दरडावून ) खडे रहो !

समशेर०—( त्याचे अंगावर जाऊन ) खडे रहो !

गुलाम०—( घाबरून ) क्या ? मरेठे लोग इधरभी है ? ये लोग क्या आस्मान्से गिरते हैं ? जमिनके अन्दरसे पैदा होते हैं ?

पद्म०—खडे रहो !

समशेर०—खडे रहो !

गुलाम०—( समशेर बहादूरास ) अरे तूं कौन है ?

समशेर०—मैं बाजीरावका बेटा हूं !

गुलाम०—बाजीराव का बेटा ? ( स्वगत ) ये छोटा लडका जो इतना बहादूर है तो बाजीराव कितना बहादूर होगा !

समशेर०—अरे मैं समशीर बहादूर हूं ! दो अपनी समशीर !

गुलाम०—अरे समशीर देने की बात न निकाल ! इस समशीरसे अभी तेरी गर्दन ही उडाऊं गा !

पद्म०—( आवेशानें ) बक बक न कर ! दे आपनी तल्वार !

गुलाम०—क्यं ? तूं भी आती है ? अच्छा ! तो तेरीही गर्दन—

पद्म०—( त्याचा हात पकडून ) अरे छोड दो बात ! तेरे सरीखा बन्दर—(गुलाम कादर खूप झटपट करतो, पण त्याचें कांहीं चालत नाहीं.)

समशेर०—( त्याची तरवार हिसकावून घेऊन ) अजी मि यासाहेब कहां है अपनी समशीर ?

गुलाम०—( रडत ) वो गई ! वो मेरे हातसे गई ! ( स्वगत ) अः तल्वार गई सो गई ! मगर पैसा तो बचा ! ( पुढें जाऊं लागतो. )

पद्म०—( त्यास पुन्हा दरडावून ) पैसा निकालो !

गुलाम०—नहीं, मेरे पास पैसा बैसा कुछ नहीं !

पद्म०—कुछ नहीं ?

समशेर०—( तरवार उगारून ) निकालो पैसा ! नहीं तो गर्दन उडावूंगा !

गुलाम०—मैं सच् बोलता हूं—मेरे पास पैसा बैसा कुछ नहीं !

पद्म०—करो ऊपर हाथ !

गुलाम०—( रडत रडत ) अच्छा करता हूं ! [ त्याचेपासून पैशाचीं गाठोडी पडतात ]

पद्म०—ये क्या है ? पैसा नहीं तो ये क्या है ?

गुलाम०—( स्वगत ) पैसा गया, मगर जान तो बची !

पद्म०—अरे कोण आहे रे तिकडे ? [ एक मावळा प्रवेश करतो. ]

पद्म०—आपल्या धन्यावर उलटणाऱ्या ह्या बदमाष मनुष्याला आत्तांच्या आत्तां फांशी द्या !

गुलाम०—( स्वागत ) क्या ? फांशी ? अफ्सोस् ! अफ्सोस ! मेरे दोनों मालिकों के साथ मैं बेईमान होगया उस्का अच्छा बदला मिला ! मैं पैसे कीं लालचमें पडा मगर मेरा पैसा भी गया—इज्जत भी गई—और आखिर जान भी गई !

( त्यास मावळा घेऊन जातो. )

पद्म०—हे असलं बइमान लोक निघाले ह्मणजे कोणती रिसायत धुळीला मिळणार नाहीं ? बरं झालं कीं मराठी लष्करांत असले विश्वासघातकी कोणी नाहींत ! खरोखर आज सहा सहा महिन्यांचे ह्या शिपायांचे

पगार तुम्बलेले असतांही ते खुषीनं लढत आहेत ! पण हा सारा बाजीरावा सारख्या पुढाऱ्यांचा प्रताप ! हा स्वतः पराक्रमी, स्वार्थत्यागी आणि कष्टाळु आहे ह्मणूनच आज प्रत्येक शिपाई वाटेल ते कष्ट सोसायला खुषीनं तयार आहे ! बरं झालं कीं हा पैसा वेळेवर मिळाला ! बाजीराव साहेबांना हा नेऊन दिला ह्मणजे सगळ्या मराठी सैन्यांची रंगपंचमी आनन्दाची होईल ! ( किल्ल्याकडे पाहून ) अग बाई ! शत्रूचे आणखी लोक खालीं यायला लागले ! पण ह्या साऱ्या मुलखांत गुप्त वेषानं हिण्डून मी लोकांची स्वदेश भक्ति इतकी जागी करून ठेवलेली आहे कीं शत्रूच्या एकाही शिपायाला हे जाऊं देणार नाहींत आणि धान्याच्या एका कणाचीही रसद शत्रूला पोंचविणार नाहींत ! राष्ट्रांत स्वदेश भक्तीची ज्योत पेटविली तरच पुढाऱ्यांच्या कार्याला यश येत जाईल आणि तरच राष्ट्राचं पाऊल स्वातंत्र्याकडे पडेल !–( तोफांचा आवाज ) अगबाई–किल्ला सर झाला कीं काय ? ( जाते )

[ गोविन्दपन्त व बाजीराव प्रवेश करतात. ]

गोविन्द०—सरकार, किल्ला सर झाला !

बाजी०—( आनन्दाने ) कुणी, कुणी केला ?

गोविन्द०—आपल्या एका तरुण सरदारानं केला सरकार !

बाजी०—आणा, आणा त्याला इकडे !

गोविन्द०—( आनन्दानें ) हा पहा सरकार, तो तरुण सरदार इकडेच येतो आहे ! ( जातो )

बाजी०—( स्वगत ) हा तरुण सरदार कोण असेल बरं !

[ मस्तानी पुरुष वेषांत प्रवेश करते. ]

मस्तानी०—हा आपला तरुण सरदार !

बाजी०—( पाहून आश्चर्यानें ) कोण ? कोण ? मस्तानी !

मस्तानी०—होय तीच मी आपली लाडकी !

बाजीराव०—( तिच्या तोण्डावरचा घाम पुसून ) अग, पण हें अचाट साहस तूं कसं केलंस ?

मस्तानी०—ह्यांत काय नवल आहे ? लोहचुम्बकामुळें लोखण्डाची सुई नाचूं लागते, तो कांहीं सुईचा गुण नव्हे ! आपल्या पराक्रमामुळें सगळ्या महाराष्ट्रांचा चैतन्य आलेलं आहे, मग मलाच साहसाचं स्फुरण कां येणार नाहीं ?

पद ४७ वें

ममसारसा । सुरसा रसा । प्रकटासि मधुरचन्द्र । सान्द्र हृदयि मम । प्रणय केन्द्र । मम सुखेन्द्र । निशिदिनिं । मज्जसि तन्द्री । सहसा ॥ध्रु०॥ सुखजलसागर । गुणनिधि–सरिता । भ्रमांत तमांत । तरणि–किरण–सम । गुणगणी अनुदिन । भुलवि खुलवि चेतसा ॥ १ ॥

( पडदा पडतो. काशीबाई व नानासाहेब प्रवेश करतात. )

काशी०—नाना, चल, चल लवकर ! हें पहा बाकीच्या सर्व गोष्टीची काळजी आपल्यालाच केली पाहिजे ! अरे तिकडे फक्त लढण्याचं काम ! पैशाचा घोर तिकडच्या जिवाला लागतां उपयोगी नाहीं !

नाना०—चल, चल, आई !

काशी०—अरे पण सगळ्या शिपायांचीं तोण्डं आज कशी टवटवीत दिसताहेत ! जय मिळाला वाटतं !

नाना०—अग आई, बाजीराव म्हणजे विजयच ! ते—ते बघ राव-साहेब किल्ल्यांत शिरताहेत !

[ गोविन्दराव प्रवेश करतो. ]

गोविन्द०—( आनन्दानें ) कोण ? बाईसाहेब ? वाः ! आपल्या येण्यानं दुधांत साखर पडली ! आजची रंगपंचमी खरी आनन्दाची होणार !

काशी०—काय, काय झालं ?

गोविन्द०—किल्ला सर झाला !

नाना०—कुणी केला ?

गोविन्द०—आपल्या एका तरुण सरदारानं !

काशी०—कोण बाई सरदार तो ?

गोविन्द०—सरकार स्वारी आतांच त्याला घेऊन वर किल्यावर गेली आहे ! चला तिकडेच. ( जातात. पडदा उघडतो. बाजीराव एकटाच प्रवेश करतो. )

बाजीराव०—आज सर्व गोष्टी मनाजोगत्या झाल्या ! पण फक्त शिपायांचीं तोण्डं गोड करायला पैसा नाहीं ! ह्या जंजीऱ्याच्या किल्ल्यांत खजिना सांपडेल अशी आशा होती—पण शत्रूनं जातांना खजिना हालविल्याचं दिसतय् ! आतां काय करावं बरं ?

[ काशीबाई प्रवेश करते ]

काशी०—हा घ्यावा पैसा !

बाजीराव०—( आनन्दानें ) काय तूं ? अहाहा, काय कष्ट घेतलेस तूं माझ्यासाठीं ?

काशी०—आपल्या जिवाला कष्ट पडूं नयेत म्हणून आह्मी कष्ट घेणं जरूरच आहे !

बाजी०—( पैशाकडे पाहून ) अग, पण शिपायांचे सहा महिन्यांचे पगार देणं आहे—तेव्हां पैसा पुरला नाहीं तर !

काशी०—तर हे घ्यायचे माझे दागिने ! महाराष्ट्राच्या ह्या दागिन्यापेक्षां कांहीं माझें दागिनें ज्यास्त आवडते नाहींत ! ( दागिनें काढूं लागते. )

[ पदमकुंवारी प्रवेश करते ]

पद्म०—नको, नको, काशीबाईसाहेब ! हा पहा शत्रूचा खजिना

( पैशाच्या थैल्या मावळ्याच्याकडून आणून पुढें ठेवते. )

काशी०—कोण ताईसाहेब ?

बाजी०—ताईसाहेब हा खजिना आपण कसा आणलांत ?

पद्म०—ह्या रयतेच्या जिवावर ! खजिना पळवून नेणाऱ्या प्रत्येक शिपायाला लोकांनी पकडलं व त्यांच्या जवळचा पैसा हिसकावून घेतला !

बाजी०—( हंसून ) पण ताईसाहेब ही आपलीच कामगिरी दिसतीय !

( नानासाहेब समशेरला घेऊन येतो )

काशी०—हाच का समशेर बहाद्दर ! किती मोठा झाला हा ! किति गोण्डस दिसतोय ह्याचा चेहरा ! खरंच बाई ह्याला घ्यावासा वाटतोय !

नाना०—आई, हा बघ समशेर !

( समशेर पदमकुंवरकडे जाऊन तिला बिलगतो )

समशेर०—मावशी—मावशी—

काशी०—( त्याला ओढुन ) इकडे ये-इकडे ये !

समशेर०—मी नाहीं जा, मावशी, मी तुझ्या कडेवर बसेन अं !

पद्म०—अरे, तूं असा एकसारखा कडेवर बसतोस हें चांगलं नाही !

समशेर०—अग, आईच्या कडेवर बसणं हा मुलांचा जन्मसिद्ध हक्कच आहे !

पद्म०—( हांसून ) अरे, पण मी तुझी आई कुठें आहे ?

सम०—अग मावशी ! मावशी असलीस ह्मणून काय झालें ! मावशीन् आई सारखीच !

पद्म०—अरे, तूं बाजीराव साहेबांचा मुलगा न् कडेवर बसतोस ? बाजीराव साहेब कसे शूर !

समशेर—अन् मी काय कमी शूर आहे ?

पद्म०—( हंसून ) हं सांगा सांगा पाहू आपला शूरपणा !

समशेर—मी स्वतःच्या हातांनीं जेवतों !

बाजी०—वाः ! वाः ! फारच मोठा शूरपणा !

काशी०—( प्रेम न आवरून ) मी तुला भरवीत जाईन अं ! ( त्याला बोलावते )

समशेर०—पण तूं कोण ?

नाना०—अरे ही तुझी आई !

काशी०—खरंच मी तुझी आई !

समशेर०—मावशी खरं का ग हें ?

पद्म०—हो हो अगदी खरं !

( काशीबाई त्याला माण्डीवर घेऊन प्रेमानें त्याचें चुम्बन घेते )

बाजी०—( हंसून ) ताईसाहेब, आतां लवकरच समशेर बहाद्दराची मुंज केली पाहिजे !

नाना०—( हंसून ) खरंच, करा रावसाहेब ह्याची मुंज !

पद्म०—अहो पण ह्याची मुंज आजच झाली ! काशीसाहेबांनीं ह्याला प्रेमानं आपल्या माण्डीवर घेतला ह्यांतच ह्यांचं मुंजींतलं मातृ-भोजन झालं !

बाजी०—( पडद्याकडे पाहून ) ओ हो ! हे आले आज किल्ला काबीज करणारे आमचे तरुण सरदार !

काशी०—खरंच या वीराला मी आज मोठं बक्षीस देणार आहे !

बाजी०—( हंसून ) पहा बरं, ऐत्या वेळीं माघार घेशिल !

काशी०—( हंसून ) मुळींच नाहीं ! ह्या माझ्या हातांतल्या बांगड्या मी त्याला देणार !

बाजी०—मग घ्या ह्याला !

[ मस्तानी येते. तिला पाहून काशीबाई चपापते ]

बाजी०—अग, चपापूं नकोस ! ह्याच मस्तानीनं पुरुष वेष घेऊन आज जंजिरा काबीज केला !

काशी०—( कौतुकानें ) अग बाई, खरंच का ?

बाजी०—अगदीं खरं !

काशी०—मग इकडच्या कामगिरींत मदत करणारणीला मी दूर कशी ठेवूं ? या मस्तानीबाई या. आजपासनं तुमच्या विषयींचं माझ्या मनांतलं सगळं गेलं ! या–मला कडकडून भेटा ! ( त्या तशा भेटतात. )

पद्म०—हा गंगा यमुनांचा संगम बघून माझ्या डोळ्यांत आनन्दाच्या गंगायमुना येत आहेत. ( समशेर बहादुराला जवळ घेते. ) मस्तानी मी तुला रंगपंचमीला पत्र पाठवायला सांगितलं, पण इथं खरी रंगपंचमी झाली !

बाजी०—या रंगपंचमीला सर्वांना त्यांच्या कामगिरीबद्दल देणग्या देउया ! गोविंदा–( गोविंदपंत येतो ) राणोजी शिंद्याला ग्वाल्हेर संस्थान द्या, मल्हारी होळकरला इन्दूर संस्थान देऊन टाका. पवारला धार संस्थानची जहागिरी बहाल करा–

काशी०—ह्या गोविंदानंही फार कामगिरी केलेली आहे.

बाजी०—होय, मी त्याला विसरलो नाहीं. आमच्या राज्यांत ब्राह्मण ब्राह्मणेतर हा भेद नाहीं. बुन्देलखण्ड संस्थान ह्याला द्यायचंच !

मस्तानी०—गोविन्दपन्त आजपासनं तुम्ही गोविन्दपन्त बुंदेले झालात. ( चिमाजी अप्पा प्रवेश करतो )

बाजी०—कोण ? चिमाजी अप्पा ! वसई घेतलीस ?

चिमाजी०—होय वसईवर भगवा झेण्डा फडकला !

बाजी०—अहाहा ! कायही आनन्दाची बातमी ! [ दोघे एकमेकांना भेटतात. ]

पद्म०—अप्पासाहेब, या तुमच्या विजयावर शाहीर पोवाडे रचतील ! खरोखर काय हा आनन्द.

[ ब्रह्मेन्द्र स्वामी प्रवेश करतात. ]

ब्रह्मेन्द्र०—आनन्दी आनन्द ! आनन्दी आनन्द !

बाजी०—आणि महाराज ! आपलं आगमन, हा तर आनन्दाचा कळस !

ब्रह्मेन्द्र०—बाजीराव तुझा असाच विजय होवो !

बाजी०—आपल्या आशिर्वादानं तसंच होईल !

ब्रम्हेन्द्र—बाजीराव, दिल्लीवर नादिरशहानं स्वारी केलेली आहे आणि तिकडे श्रीशाहुमहाराजांनीं तुझीच नेमणूक केलेली आहे ! बाजीराव, सर्व हिन्दुस्थान परशत्रूपासून मुक्त कर आणि अपूर्व यश मिळीव !

बाजी०—मग महाराज ही म्यानांतली तरवार पुन्हां बाहेर काढली ! मुसलमानी सिंहासनाची अब्रू ह्मणजेच आमचीच अब्रू ! परकीय शत्रूनं

आमच्या देशावर स्वारी केली असतां, आमच्याजवळ हिन्दु--मुसलमान हा भेद नाहीं! जोंपर्यंत परकीय शत्रू हिन्दुस्थानांत शिरलेला नाहीं तोंपर्यंतच ह्या देशांत हिन्दुमुसलमानाचे तण्टे! पण परकीय शत्रू ह्या देशाच्या सरहद्दीवर येऊन खडा राह्यला म्हणजे हिन्दुमुसलमान, सारे एक! चला हिन्दूनों, देशासाठीं लढायला चला! चला, मुसलमानांनों, देशासाठी लढायला चला! खिस्ती बन्धूनों, हिन्दू मुसलमानांच्या खान्द्याला खान्दा लावा आणि ह्या हिन्दमातेच्या स्वातंत्र्याकरितां लढायला तयार व्हा!

सर्व०---वन्देमातरम्! वन्देमातरम्!

पद ४८ वे.

( चाल--सैय्या बोलो बात. )

व्योमि निशाण जाण।
भारत जनासि वदाया।
उठा उठा सुजाण॥ धृ०॥
हे पाजळोनि ज्ञान दीप।
बन्धुतेसि गाजवा।
द्वैत हरुनि ऐक्य करुनि
स्फुरवितें स्वकीय भाव।
हिन्दभूप्रमाण॥ १॥

[ सर्वजण कोरसमधें सामील होतात. ]



# आजपर्यंत "तीन-आणे-मालें"तून प्रसिद्ध झालेली पुस्तकें.

| | |
|---|---|
| १ विचित्र-रहस्य (शि. नाहीं) | २ उसन्या सूनबाई |
| ३ पहिली रात्र | ४ साखरपुडा |
| ५ नटीचे नाच | ६ विस्कटलेली वेणी |
| ७ देवाचे दुनियेंत | ८ अन्तरपाठ |
| ९ रंगेल रंग | १० बिजेची दिवाळी |
| ११ सुरेल बांसरी | १२ वसुंधरा |
| १३ कुमारी माधुरी | १४ देवाची दंडेली |
| १५ जन्मरहस्य | १६ पोलक्यांतला चोळका |
| १७ दानवी सत्ता | १८ चारुशीला |
| १९ मायावती | २० गोड गुलकंद |
| २१ प्यारी मुमताज | २२ दुनिया झुकती है |
| २३ रंकाचा राव | २४ थोर कोण |
| २५ विलायती संसार | २६ कथापंचक |
| २७ सैतानी कत्तल | २८ वेश्या आणि वकील |
| २९ लिलेची माळ. | ३० तारा |

श्रीरामदास प्रि. प्रेस, मुंबई, नं. ४,

युनायटेड पिक्चर्स सिंडिकेटचे
तयार चित्रपट.

न. दा. सरपोतदारकृत.

१ महाराची पोर (सामाजिक)
२ चंद्रराव मोरे (ऐतिहासिक)
३ छत्रपती संभाजी ,,
४ उमाजी नाईक ,,
५ नाई तेलीण ,,

श्री. न. चिं. केळकरकृत.

तोतयाचें बंड. (ऐतिहासिक)

बुकिंगसाठीं लिहा:—

युनायटेड पिक्चर्स सिंडिकेट

KIRKEE, [ G. I. P. Ry. ]